


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

# राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष तिसरें
अंक चौथा

# नवभारत

जानेवारी १९५०

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.









अनुक्रमणिका

# ' नवभारत ', जानेवारी १९५०

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**प्रा. वि. म. दांडेकर**—पुणें येथील ' गोखले अर्थशास्त्र-संशोधनसंस्थे 'मध्यें संख्याशास्त्रज्ञ आणि कृषि-अर्थ-शास्त्रविभागाचे प्रमुख. पुणें विद्यापिठांत संख्याशास्त्रविभागाचे प्रमुख.

**डॉ. मो. वा. चिपळूणकर**, एम्. एस्सी.( बनारस ), डी. एस्सी. ( मुंबई )— ' मूस ' मेडॅलिस्ट. 'स्फटिक' , 'धरणीकंप' इत्यादी पुस्तकांचे लेखक. 'सृष्टिज्ञान' मासिकाचे कार्यकारी संपादक.

**प्रा. वि. म. कुळकर्णी**—बेळगांव येथील लिंगराज कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' पहांटवारा ', ' साहित्य-दर्शन ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**प्रा. शं. पु. आघारकर**. एम्. ए., पीएच्. डी. ( बर्लिन )—कलकत्ता विद्यापीठांतील वनस्पति-शास्त्राच्या ' घोष ' प्राध्यापकपदावरून तीन वर्षांपूर्वी सेवानिवृत्त झाले. हल्लीं पुणें येथें ' महाराष्ट्र असोसिएशन फॉर दि कल्टिव्हेशन ऑफ सायन्स ' या पुणें विद्यापीठमान्य पदव्युत्तर संशोधन-संस्थेचे प्रमुख. अखिलभारतीय शास्त्रीय परिषदेचे १९२४ ते १९३५ पर्यंत माननीय सर-चिटणीस व त्या परिषदेच्या कार्यकारिणीचे १९४६ पर्यंत सदस्य. या संघटनाविषयक सेवेबद्दल बंगालच्या ' रॉयल एशिॲटिक सोसायटी 'कडून त्यांना ' सायन्स कॉंग्रेस पदक ' मिळालें. ' नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ सायन्सेस, इंडिया ' या संस्थेचे १९३५–१९४५ पर्यंत माननीय चिटणीस. ' इंपीरिअल ( हल्लीं इंडिअन ) कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रीसर्च 'च्या अनेक समित्यांवरील १९३० पासून सदस्य. अनेक विज्ञानविषयक विशेषज्ञसमितींचे पदाधिकारी.

**डॉ. श्री. द. लिमये**—रसायनशास्त्राचे पीएच्. डी.; रानडे इन्स्टिटयूटचे भूतपूर्व संचालक; ' रसायन-शास्त्र आणि जीवन ' ही यांची पुस्तिका प्रकाशनाच्या वाटेवर आहे.

**श्री. भा. म. ऊर्फ बापूसाहेब गुप्ते**, एम्. ए., एलूएल्. बी., ( पुणें )—घटनासमितीचे आणि मुंबई विधिमंडळाचे सदस्य.

**श्री. दि. के. बेडेकर** ( पुणें )—' सोव्हिएट राष्ट्रें व लोक ', ' संयुक्त महाराष्ट्र ' इत्यादी पुस्तकांचे कर्ते.

---

स्व. आचार्य जगदीशचंद्र बसु, अनुवादक : श्री. ना. ग. जोशी

# मंदिराची प्रतिष्ठापना

[1]बावीस वर्षांपूर्वी जी संस्मरणीय घटना घडली त्यावेळीं देवतेच्या करुणेचा विशेष अनुभव मला आला होता. त्या समयीं (सुमारें १८९५ सालीं) मला ज्याचा विचार आला तें एवढ्या काळानंतर देव-चरणीं अर्पण करण्याची वेळ प्राप्त झाली. आज ज्याची प्रतिष्ठापना होत आहे तें मंदिर आहे, प्रयोगशाळा नव्हे. जें सत्य इंद्रियानें ग्रहण करतां येतें तें परीक्षा करून निश्चित करतां येतें. परंतु इंद्रियांहून अतीत अशीं जीं एकदोन महासत्यें आहेत तीं प्राप्त करण्यासाठीं केवळ श्रद्धेचीच जरूर पडते.

वैज्ञानिक सत्य केवळ परीक्षेच्या द्वारें निश्चित ठरतें. त्यासाठीं मोठ्या साधनेची जरूर असतेच; कारण जें कल्पनेंत असतें तें इंद्रियगोचर करावें लागतें. जो प्रकाश डोळ्याला अदृश्य असतो तो चक्षुर्ग्राह्य करावा लागतो. शरीरनिर्मित इंद्रिय जेव्हां पराजित होतें तेव्हां धातुनिर्मित अतींद्रियाचें साहाय्य घ्यावें लागतें. जें जग थोड्या काळापूर्वी अशब्द आणि अंधकारमय असतें त्याच्या गंभीर आवाजाची आणि प्रकाशपुंजाची आपणाला पाहतां पाहतां संवय होते.

हें सर्व केवळ इंद्रियगम्य नसलें तरी मानवानें निर्मिलेल्या कृत्रिम इंद्रियांच्या द्वारें त्याची प्राप्ति वरून घेतां येते. पण इतर अनेक घटना अशा आहेत कीं त्या इंद्रियांना कळत नाहींत. या घटना केवळ श्रद्धेच्या बळावरच प्राप्त करून घ्याव्या लागतात. श्रद्धेच्या सत्यतेचीहि परीक्षा असते. ही परीक्षा कांहीं एकदोन घटनांनीं होत नाहीं; त्याची खरी परीक्षा करण्यासाठीं जीवनव्यापी साधनेची आवश्यकता असते. अशा सत्याची प्रतिष्ठापना करण्यासाठींच मंदिराची रचना होत आहे.

तर मग ज्यासाठीं या मंदिराची प्रतिष्ठापना झाला तें महासत्य कोणतें ? तें सत्य असें आहे : जेव्हां मानव आपलें जीवन आणि आराधना कोणत्याहि उद्देशासाठीं समर्पण करतो तेव्हां तो उद्देश कधींहि विफल होत नाहीं. त्यावेळी जें असंभाव्य असतें तेंही संभाव्य होतें. आज माझा हेतु कोणा सामान्य जनतेकडून वाहवा ऐकण्याचा नाहीं. ज्यांनीं कर्मसागरांत उडी घेतली आहे, जे प्रतिकूल तरंगांच्या अपघातानें अर्धमेले होऊन अदृष्टाकडून होणारा पराभव स्वीकारावयास तत्पर झाले आहेत, त्याच्यासाठींच मला आज कांहीं सांगावयाचें आहे.

## परीक्षा

ज्या परीक्षेची गोष्ट मीं तुम्हाला सांगणार आहे, ती उत्तीर्ण व्हावयास मला दोन जीवनें पहावीं लागलीं. ज्याप्रमाणें कोणा लतेची परीक्षा केल्यामुळें सबंध उद्‌भिद-जीवनांतील अस्सल सत्य प्रकाशित होतें, त्याप्रमाणेंच मानवजीवनांतील

---

१ प्रस्तुत लेख हा ' बसु विज्ञानमंदिरा 'च्या वेळीं ( सन १९१७ ) आचार्य जगदीशचंद्रांनीं केलेलें भाषण आहे. मूळ बंगालीचा गुजराती अनुवाद श्री. जयंतीलाल आचार्य यांनीं " प्रस्थान " मासिकाच्या आषाढाच्या अंकांत केला आहे. त्याचा हा मराठी अनुवाद आहे. —अनु०





अनुक्रमणिका

श्रद्धेच्या फलामुळें श्रद्धेच्या समग्र सत्याची प्रस्थापना होते. म्हणून माझ्या स्वतःच्या जीवनांत ज्या सत्याची परीक्षा झाली त्याबद्दल जर एकदोन शब्द मी उच्चारले तर आपण ते सहन करावेत.

माझे स्वर्गवासी वडील श्री. भगवानूचंद्र बसु यांच्या उदाहरणानें माझी परीक्षा सुरू झाली. ही गोष्ट अर्ध्या शतकापूर्वीची आहे. माझे शिक्षण व दीक्षा त्यांच्याजवळच झाली. त्यांनी मला दाखविलें कीं, इतरांवर प्रभुत्व गाजविण्यापेक्षां आपल्या जीवनावरच शासन मिळविणें अनेक पटींनें श्रेयस्कर आहे. लोकहिताच्या अनेक कामांत त्यांनी आपलें जीवन समर्पण केलें होतें. शिक्षण, उद्योग आणि व्यापार यांच्या उद्धारासाठीं त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केले व त्यासाठीं आपलें सर्वस्व वेंचलें होतें. पण त्यांचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. सुखसंपत्तीचा गालीचा सोडून दारिद्र्याचें लांछन त्यांना भोगावें लागलें. सर्व म्हणूं लागले कीं, त्यांचें जीवन फुकट गेलें ! ह्या घटनेवरून मला हें शिकतां आलें कीं, सफलता किती क्षुद्र असते आणि एखादी निष्फलता किती बृहद् असूं शकते ! माझ्या परीक्षेचा प्रथम अध्याय असा लिहिला गेला.

त्यानंतर बत्तीस वर्षें गेलीं. शिक्षणाचें कार्य मी स्वीकारलें. विज्ञानाचा इतिहास शिकवीत असतां मला पुष्कळ देशांतल्या वैज्ञानिकांच्या गोष्टी सांगाव्या लागत. पण मी पाहूं लागलों कीं, यांत भारताचें स्थान कोठें आहे ? शिक्षकाचें काम म्हणजे इतरांनीं जें कांहीं सांगितलें होतें तें सर्व शिकवावयाचें; भारतांतील लोक केवळ भावनाशील व स्वप्नदर्शी आहेत; संशोधनाचें त्यांचें काम असूं शकणारच नाहीं, अशा गोष्टी मीं ऐकत आलों होतों. आणखी असें ऐकलें होतें कीं, आपल्या देशांत विलायतेसारख्या प्रयोगशाळा नाहींत, तेव्हां सूक्ष्मयंत्रें या देशांत कधींहि तयार करतां येणार नाहींत. मनांत आलें कीं ज्या व्यक्तीनें पौरुष गमावलें असेल तीच असल्या गोष्टी बोलत असेल ! अवसाद (निरुत्साहपणा) नाहींसा करावा लागेल, दुर्बलता टाकून द्यावी लागेल. माझी कर्मभूमि भारतवर्ष आहे, माझ्यासाठीं सरळ मार्ग उत्पन्न झालेला नाहीं. आज तेवीस वर्षांपूर्वी असा विचार करून एका युवकानें आपलें समग्र मन, समग्र प्राण आणि साधना हीं अदृष्ट भवितव्याच्या हातीं समर्पण केलीं. त्याच्यापाशीं नव्हतें पैशाचें बळ कीं नव्हता कोणी मार्गदर्शक ! अनेक वर्षें तो प्रतिकूल परिस्थितीशीं एकटा झुंजला. आज त्याचें तें समर्पण सार्थ झालें आहे.

## जय–पराजय

तेवीस वर्षांपूर्वी या आजच्या दिवशीं ज्या आशेनें कार्याला सुरुवात केली होती तिचें फळ परमेश्वरकृपेनें तीन महिन्यांत दिसलें. जर्मनींत आचार्य हर्ट्झ् यांनीं विद्युत्तरंगांविषयीं जें प्रचंड कार्य आरंभिलें होतें त्याचा पुष्कळ विस्तार व परिणति येथें शक्य झाली होती. परंतु या देशांतील एका प्रसिद्ध सभेंत जेव्हां मी माझ्या नवसंशोधनाचा वृत्तांत सांगितला तेव्हां कोणाहि सभासदानें माझ्या कार्याविषयीं कोणत्याहि प्रकारचा ऊहापोह केला नाहीं ! मला समजून आलें कीं, भारतवासीयांच्या विज्ञानाबाबतच्या कार्याबद्दल ते सर्व साशंक होते. त्यानंतर माझा दुसरा शोध वर्तमानकाळांतील सर्वश्रेष्ठ पदार्थवेत्त्यांपुढें मांडला. बावीस वर्षांपूर्वी त्यांचें उत्तर मला आलें. त्यांत कळविलें होतें कीं, माझा शोध रॉयल सोसायटीतर्फें प्रगट होईल आणि मीं शोधून काढलेलीं तत्त्वें भावी वैज्ञानिक उन्नतीला सहायक ठरलीं असल्यामुळें पार्लमेंटाकडून मिळणारी शिष्यवृत्ति मी माझ्या संशोधनकार्यासाठीं वापरावी त्या दिवशीं भारतवर्षासाठीं बंद असलेलें दार आपोआप उघडलें ! आतां कोणी तें अडवूं शकणार नाहीं. त्या दिवशीं जो वह्नि चेतला तो कधींहि विझणार नाहीं !

या आशेनें मी वर्षानुवर्षे कंटाळल्याविना मनानें व शरीरानें कार्यक्षेत्रामध्यें पुढेंपुढें गेलों. पण मानवाची खरी परीक्षा कांहीं एका दिवसांतच होत नसते. सबंध आयुष्यभर त्याला आशा व निराशा यांमधून परीक्षित बनावें लागतें. जेव्हां माझी वैज्ञानिक प्रतिष्ठापना आशातीत उच्च स्थानीं झाली होती, त्यावेळींहि सबंध जीवनभर केलेंकरविलेलें सर्व फुकट जायची वेळ आली होती !








## मंदिराची प्रतिष्ठापना

त्यावेळीं बिनतारी संदेश ग्रहण करणारें यंत्र तयार करून त्याची परीक्षा मी करीत होतों. तों मला आढळलें कीं एकाएकीं यंत्राचें कार्य कोणा अज्ञात कारणामुळें बंद पडलें आहे. मनुष्याच्या लेखनरीतीवरून ज्याप्रमाणें त्याच्या शारीरिक दुर्बलतेबद्दल किंवा क्लांतीबद्दल कल्पना करतां येते, त्याप्रमाणें यंत्राच्या उत्तरलिपीवरून तशीं चिन्हें मला पाहतां आलीं. याहून आश्चर्याची गोष्ट ही घडली कीं विश्रांति घेतल्यावर यंत्राचा थकवा गेला आणि फिरून यंत्राकडून उत्तर ( response )मिळूं लागलें! उत्तेजक औषधाच्या प्रयोगानें त्याची उत्तर देण्याची शक्ति वाढली आणि विषाच्या प्रयोगानें ती अगदीं नाहींशी झाली. प्रतिक्रियेची शक्ति जीवनाचें एक मुख्य लक्षण मानलें जाई; ती जडवस्तूंतहि दिसून आली ! ही अत्यंत आश्चर्यकारक हकीकत मी रॉयल सोसायटीपुढें परीक्षाद्वारें सप्रमाण सिद्ध केली. परंतु दुर्दैवानें हें प्रचलित सिद्धांताच्या विरुद्ध मानलें गेल्यामुळें जीवशास्त्रांतील एकदोन अग्रणी यामुळें असंतुष्ट झाले. शिवाय मी होतों पदार्थविज्ञानवेत्ता; तेव्हां आपली हद्द ओलांडून जीवशास्त्रज्ञांच्या नव्या जातींत प्रवेश करण्याचा तो अनधिकारी प्रयत्न रीतीविरुद्ध मानला गेला! त्यानंतर एकदोन विचित्र प्रसंग घडले. जे माझ्याविरुद्ध होते त्यांपैकीं एकजणानें माझा शोध मागाहून आपला शोध म्हणून प्रसिद्ध केला ! याविषयीं अधिक सांगणें अनुचित होय. परिणामीं, पुष्कळ वर्षेपर्यंत माझें सगळें कार्य नष्ट झालें. इतकीं वर्षें एक दिवसहि ढग पांगून सूर्याचा प्रकाश पडलेला मी पाहिला नाहीं. ह्या सर्व आठवणी क्लेशकारक आहेत; पण त्या सांगण्यांतील एकमात्र हेतु हा आहे कीं, जर कोणी बृहत्कार्यास आपलें जीवन समर्पण करण्यास तयार झाला तर त्यानें फलाफलाच्या बाबतींत निरपेक्ष राहण्याचा धडा घ्यावा. आपल्यामध्यें असीम धैर्य असलें तर त्याच्या योगें श्रद्धेच्या नेत्रानें त्याला एक दिवस असें पाहावयास मिळेल कीं, वारंवार पराजित झाला तरी जो तोंड फिरवीत नाहीं तोच एकदां विजयी व्हावयाचा आहे.

### पृथ्वीपर्यटन

भाग्याचें व कार्याचें चक्र निरंतर फिरत आहे. त्याचे नियम आहेत उत्थान, पतन आणि फिरून पुनरुत्थान. बारा बारा वर्षें जे वाईट दिवस माझ्यावर आघात करीत असतांहि माझा पराभव करूं शकले नाहींत, ते दुर्भाग्याचे दिवस एकदां कोठच्या कोठें निघून गेले. माझ्या नव्या संशोधनाचा वैज्ञानिक लोकांत प्रचार करण्यासाठीं हिंदुस्थानसरकारनें इ. स. १८९४ मध्यें मला पृथ्वीपर्यटन करण्यास पाठविलें. या निमित्तानें लंडन, ऑक्सफर्ड, केंब्रिज, पॅरीस, व्हिएन्ना, हार्वर्ड, न्यूयॉर्क, वॉशिंग्टन, फिलाडेल्फिया, शिकागो, कॅलिफोर्निया, टोकियो वगैरे ठिकाणीं माझ्या शोधांची परीक्षा घेतली गेली. या सर्व ठिकाणीं माझ्यासाठीं कांहीं कोणी विजयाची माळ हातांत घेऊन वाट पहात नव्हतें ! उलट माझे प्रबल प्रतिस्पर्धी माझी चूक दाखविण्यासाठीं आपलें दल तयार करून हजर होऊं लागले. त्यावेळीं मी अगदीं एकटा होतों. मात्र अदृश्यामध्यें भारताची भाग्यलक्ष्मी माझी साहाय्यकर्त्री होती. या विषम संग्रामांत भारताचा जय झाला आणि जे मला विरोध करणारे होते ते मागाहून माझे परम मित्र बनले.

### वीरनीति

उद्भिद-( वनस्पति )शास्त्राची आतांची अमर्याद उन्नति म्हणजे लाइप्झिगचे जर्मन अध्यापक फेफर यांच्या अर्धशताब्दीच्या असाधारण प्रयत्नांचें फळ होय. माझे कांहीं शोध फेफरच्या कांहीं सिद्धांतांना विरोधी आहेत. मला वाटलें कीं, यामुळें त्यांना माझ्याविषयीं असंतोष उत्पन्न झाला असेल! म्हणून मी लाइपझिगला गेलों नाहीं. पण व्हिएन्ना विश्वविद्यालयाचें आमंत्रण स्वीकारलें. तेथें फेफरनीं आपल्या एका सहकारी अध्यापकाला मला निमंत्रण देण्यासाठीं पाठविलें. त्यांनीं संदेश पाठविला होता कीं, "आपलीं प्रस्थापित झालेलीं नवीं तत्त्वें आयुष्याच्या शेवटच्या घटकेला माझ्यापर्यंत येऊन पोहोंचलीं आहेत." त्यांना दुःख हें वाटत होतें कीं, या सर्व तत्त्वांची परिणति आपणांला जिवंतपणीं पाहतां येणार नाहीं. ज्यांच्याकडून वैरभावाची शंका मला होती, त्यांनीं तर







मला मित्रभावानें स्वीकारलें! स्वतःचा पराभव होतांनाहि सत्याचा जय पाहून आनंदानें उचंबळून येणें हीच चिरंतन वीरनीति आहे. हजारों वर्षांपूर्वी कुरुक्षेत्रांत अशा वीरधर्माचाच प्रचार चालू होता. जेव्हां अग्निबाणांनीं भीष्मदेव विद्ध झाले, तेव्हां आनंदाच्या आवेगांत उद्गारले : " माझें शिक्षणाचें दान सार्थ झालें. हा बाण शिखंडीचा नव्हे; तो माझा प्रिय शिष्य अर्जुन याचाच. "

पृथ्वीचें पर्यटन व माझ्या जीवनाचें परीक्षण यांच्यायोगें मला एवढें समजून आलें आहे कीं, नवीन तत्त्व शोधण्याला सबंध आयुष्यभर व्रत व साधना चालू रहाणें जरूरीचें आहे. जगांत त्या सत्याचा प्रचार करणें तर त्याहूनहि कठीण आहे. यामुळें माझा पूर्वीचा संकल्प अधिकच दृढ झाला. दीर्घकालीन संग्रामानंतर विज्ञानाच्या क्षेत्रांत भारतवर्षानें जें स्थान मिळाविलें आहे तें चिरस्थायी होवो! जे भविष्यकाळीं या मार्गानें जातील त्यांना मार्ग मोकळा होवो!

## विज्ञानाच्या प्रचारांतील भारताचें स्थान

विज्ञान आहे सार्वभौमिक. तर मग त्याच्या महान् क्षेत्रांत असें कांही स्थान आहे का, कीं जें भारतीय सेवकांवाचून अपुरें राहील? असें स्थान आहेच आहे.

हल्लीं विज्ञानाचा प्रसार खूप विस्तृत झाला आहे. पश्चिमेकडील देशांत कार्याच्या सुलभतेसाठीं विज्ञानाचे भाग पाडण्यांत आले आहेत आणि अशा भिन्न-भिन्न विज्ञानशाखांमध्यें अभेद्य भिंत उभी करण्यांत आली आहे. दृश्य जगत् अति विचित्र आणि बहुरूपी आहे. एवढ्या भिन्नतेमध्येंहि एक प्रकारचें साम्य आहे तें कांहीं केल्या समजत नाहीं. एका बाजूनें निरंतर चंचल असा प्राणी आणि दुसऱ्या बाजूनें चिरमौन अविचलित उद्भिद अशा या दोहोंमध्यें कांहीं सादृश्य दिसत नाहीं. शिवाय उद्भिदांत एकाच कारणाच्या योगें भिन्न भिन्न प्रत्युत्तरें मिळतात. परंतु एवढी विषमता असतांहि भारतीय विचारसरणीनें जड उद्भिद आणि जीव यांमध्यें एक सेतु बांधला आहे. असें करण्यासाठीं भारतीय साधकानें केव्हां केव्हां कल्पनेच्या मुक्त राज्यांत विचाराला प्रेरणा दिली आहे, तर केव्हां केव्हां त्या विचाराला शासनाच्या, नियमांच्या स्वाधीन केला आहे. प्रतिभेच्या आदेशाच्या सामर्थ्यानें जडवत् बनलेल्या बोटांत नव्या प्राणाचा संचार झाला आहे आणि जेथें मानवी इंद्रियें थिटीं पडलेलीं दिसलीं तेथें कृत्रिम अतींद्रियाची निर्मिति झाली आहे. यामुळें व असीम धैर्याच्या योगें अव्यक्त जगताचें सीमाहीन रहस्य परीक्षेच्या प्रणालिकेंत तावून सुलाखून प्रस्थापित करण्याचा त्या साधकानें प्रयत्न केला.

जें नजरेला कळत नाहीं तें त्यानें दृष्टिगोचर केलें आहे. कृत्रिम डोळ्यांच्या साहाय्यानें परीक्षा घेऊन मानवाच्या दृष्टीला अनाकलनीय असें नवें रहस्य त्यानें शोधलें आहे. त्याचे दोन्ही डोळे एकाच वेळीं उघडे असत नाहींत; पण एकामागून एक उघडा किंवा मिटलेला असतो. धातूच्या पत्र्यामध्यें लपून असलेली स्मृतीची अदृश्य छाप त्यानें प्रकट केली आहे. अदृश्य प्रकाशाच्या साह्यानें काळ्या पाषाणांतील निर्माणकौशल्य प्रकट केलें आहे. अणूंतील कारागिरी चक्राकार फिरणाऱ्या विजेच्या लहरींच्या द्वारें प्रकट केली आहे. वृक्षजीवनांत मानवजीवनाची प्रतिकृति असते हें दाखवून मूक जीवनाचें स्फुरण मानवाच्या अनुभवांत अंतर्भूत केलें आहे; वृक्षाची अदृश्य वाढ मोजली आहे आणि भिन्न भिन्न आहारव्यवहारांनीं होणाऱ्या वृद्धीच्या प्रमाणांतील परिवर्तन एका क्षणांत तपासलें आहे. मनुष्याच्या स्पर्शानें वृक्ष संकोच पावतात, हें सप्रमाण सिद्ध केलें आहे. जें उत्तेजक द्रव्य मनुष्याला उत्तेजित करतें, जें मादक द्रव्य त्याला अवसन्न करून टाकतें आणि जें विष त्याला मारतें, त्यांची उद्भिदांवरहि तीच प्रतिक्रिया होते, याचें प्रमाणभूत समर्थन करतां आलें आहे. विषानें गळून गेलेल्या मुमूर्षु उद्भिदांना भिन्न विषाच्या उपचारानें पुनर्जीवित करण्यांत आलें आहे. उद्भिदाच्या पेशींतील स्पंदन लिपिबद्ध करून त्यांत हृदयांतील स्पंदनाची पडछाया दाखविण्यांत आली आहे. वृक्षाच्या शरीरांतील स्नायुप्रवाहाचा शोध करून त्याचा वेग निश्चित केलेला आहे. ज्या










कारणांमुळें माणसाच्या स्नायूच्या उत्तेजनेंत वाढ किंवा घट होते त्याच कारणांनी उद्भिदाच्या स्नायूंतील आवेग उत्तेजित किंवा प्रशमित होतो, अशाबद्दलचीं प्रमाणेंहि साध्य झालीं आहेत.

वर सांगितलेल्या गोष्टी कांहीं कल्पनेंतून निघालेल्या नाहींत. गेल्या तेवीस वर्षांत माझ्या प्रयोगशाळेंत जीं तत्त्वें परीक्षा घेऊन प्रमाणभूत ठरविण्यांत आलीं आहेत त्यांचाच हा अतिशय संक्षिप्त व अपूर्ण इतिहास वर सांगितला आहे. ज्या शोधांचा उल्लेख वर केला, त्यांत अनेक दिशांतून पदार्थविज्ञान, उद्भिद-(वनस्पति)विज्ञान, प्राणिशास्त्र आणि मानसशास्त्र सुद्धां हीं सर्व एका केन्द्रामध्येंच येऊन मिळतात. जर विधात्यानें भारतीय साधकांसाठीं विज्ञानांतील कोणतें एखादें विशेष तीर्थ निश्चित केलें असेल तर तें ह्या 'चतुर्वेणी'-संगमाचें महातीर्थच असूं शकेल.

## आशा आणि श्रद्धा

हे सर्व विज्ञानाच्या अनेक शाखांतील शोध आहेत. कोणी असेंहि मानूं शकेल कीं त्याच्या विकासानें अनेक व्यावहारिक विद्यांची उन्नति तसेंच जगताचें कल्याण साधेल. ज्या आशेनें व श्रद्धेनें प्रेरित होऊन मीं या मंदिराची प्रस्थापना केली तीं काय केवळ एकट्याच्या जीवनाबरोबर समाप्त होऊन जाईल ? एखाद्या लहानशा विषयासाठीं प्रयोगशाळा स्थापावयाची झाली तरी त्यालाहि अपरिमित द्रव्याची जरूरी असते ! मग असला हा अति विस्तृत व बहुमुखी ज्ञानाचा विस्तार आपल्या देशांत असंभवनीय आहे असे अनेक सुज्ञ लोक म्हणतील. पण मी मात्र अशा विषयामध्यें केवळ श्रद्धेच्या बळावर उडी घेतली आहे; शक्य होणार नाहीं असें मानून परत फिरलों नाहीं आणि फिरणारहि नाहीं. मी जें कांहीं माझें म्हटलें आहे त्या सर्वांचें मी यासाठीं बलिदान करीन. रिकाम्या हातानें आलों होतों तो रिकाम्या हातानें निघून जाईन. मध्यंतरीं कांहीं थोडें घडलें तर तें ईश्वराचा प्रसाद मानीन. दुसरे एक सद्गृहस्थहि यासाठीं आपलें सर्वस्व द्यावयास तयार आहेत. त्यांचें साहचर्य माझ्या दुःखाच्या व पराजयाच्या काळांतहि अढळ राहिलें आहे. विधात्याच्या करुणेचा अमृत-वर्षाव वारंवार झाला आहे. जेव्हां माझ्या वैज्ञानिक कार्याबद्दल बरेचजण संदेहशील होते तेव्हांहि एकदोघाजणांच्या श्रद्धेचें बळ मला मिळालें होतें. आज ते मृत्यूच्या पैलतीराला गेले आहेत.

मनांत शंका होती कीं केवळ भविष्याच्या घटनेवर या मंदिराच्या स्थायी स्वरूपाचा आधार राहूं शकेल ! परंतु थोड्या काळानंतर समजलें कीं ज्या आशेनें मीं कार्य आरंभलें होतें त्याचें आह्वान भारताच्या दूरच्या कोनाकोपऱ्यांतहि पोंचलें आहे. हें सर्व पाहून मला वाटतें कीं जो महान् संकल्प मीं केला होता त्याची परिणति अगदीं अशक्य नाहीं. कदाचित् मी जिवंत असतांनाच या मंदिराचें सुनें आंगण देशोदेशींहून येणाऱ्या यात्रिकांनीं पूर्ण भरून गेलेलें असेल.

## संशोधन आणि प्रचार

विज्ञानाच्या अध्ययनाच्या दोन दिशा आहेत. एक नव्या तत्त्वाचें संशोधन कीं जो या मंदिराचा उद्देश आहे; दुसरी दिशा म्हणजे जगांत त्या तत्त्वांचा प्रचार. यासाठींच हें विशाल व्याख्यानगृह बांधण्यांत आलें आहे. विज्ञानाविषयक व्याख्यान व त्याचें प्रयोगदर्शन यासाठीं असें गृह कदाचित् इतर कोठें मिळणार नाहीं. येथें दीडहजार श्रोत्यांचा समावेश होण्यासारखा आहे. फार खल झालेल्या कोणत्याहि तत्त्वाची पुनरावृत्ति येथें होणार नाहीं. विज्ञानविषयांत या मंदिरांत जे शोध लागले असतील त्यांतील सर्व नवीं सत्यें प्रयोगासह सर्वांत प्रथम दाखविण्यांत येतील, सर्व जातींना सर्व स्त्री-पुरुषांना मंदिराचीं दारें खुलीं असतील. मंदिरातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या पत्रिकेंतून नवीं नवीं प्रकाशित वैज्ञानिक तत्त्वें जगांतील पंडितांपुढें ठेवण्यांत येतील आणि कदाचित् त्या द्वारें व्यावहारिक विज्ञानाचीहि उन्नति साधेल.

माझा दुसरा हेतु असाहि आहे कीं, या मंदिरांतील शिक्षण परदेशीयांना खुलें असावें. शेंकडों वर्षांपूर्वीं भारतांत ज्ञानाचा सार्वत्रिक रूपांत प्रचार होत होता. नालंदा व तक्षशिला येथें देशोदेशींहून येणारे विद्यार्थी आदरपूर्वक सन्मानिले










अनुक्रमणिका

जात. जेव्हां जेव्हां आपल्यांत देण्याची शक्ति उत्पन्न झाली, तेव्हां तेव्हां आपण महान् रूपानें दान दिलें आहे, केव्हांहि क्षुद्र रूपांत संतोष मानला नाहीं. सर्व जविनाच्या स्पर्शानें आपलें जविन प्राणमय बनलें आहे. जें कांहीं सत्य, जें कांहीं सुंदर असेल तें आपलें आराध्य होय. शिल्पकारांनीं आपल्या कारागिरीनें हें मंदिर मंडित केलें आहे, चित्रकारांनीं येथील चित्रवीथिकांतून माझ्या हृदयांतलि अव्यक्त आकांक्षा व्यक्त केली आहे.

मी जी उद्‌भिद जीवनाची गोष्ट सांगितली, तो आपल्या जीवनाचाच प्रतिध्वनि आहे कीं त्या जीवनावर आघात होऊन तें मृतप्राय बनतें आणि आपल्या क्षणिक मूर्च्छेमधून परत जागृत होतें ? या आघाताच्या दोन दिशा आहेत, आणि आपण त्या दोहोंच्या संयोगस्थळीं येऊन उभे आहोंत. एका दिशेला जीवनाचा व दुसऱ्या दिशेला मृत्यूचा मार्ग पसरला आहे. जीवाचें स्पंदन ही आघाताचीच क्रिया आहे. या आघातांतून आपण फिरून उठूं शकतों. प्रत्येक क्षणाला आपण आघाताच्या द्वारें मृतप्राय होतों आणि फिरून एकदां संजीवन मिळवितों. आघाताच्या बलानेंच जीवनाची शक्ति वाढते. क्षणोक्षणीं आपण मरत असतों, त्यामुळेंच जिवंत राहूं शकलों आहोंत.

परंतु एक दिवस असा येईल कीं जेव्हां आघाताचें प्रमाण भयंकर असेल. त्यावेळीं जो ढळेल तो पुन्हा उठणार नाहीं, त्याला कोणी उठवूं शकणार नाहीं. स्वजनांचा सर्व आक्रोश व्यर्थ होईल, सतींची आयुष्यभर केलेलीं व्रतें व साधना निष्फळ होतील. ज्या मृत्यूच्या स्पर्शानें आपली सर्व उत्कंठा, आपलें चांचल्य शांत होऊन जातें त्याचें राज्य कोण्या देशीं असेल ? त्याचें रहस्य कोण उघडें करील ? अज्ञानाच्या अंधकारानें आपण झांकले गेलों आहोंत. डोळ्यावरचें आवरण दूर सरकल्याबरोबर या क्षुद्र विश्वाच्या मागें लपलेल्या एका अचिंतनीय अशा नव्या विश्वाच्या अनंत व्याप्तिमुळें आपण हाय खातों !

कोणाला माहीत होतें कीं या आर्तनादहीन उद्‌भिदजगांत, या मुक्या असीम जीव-संचारांत अनुभूतीच्या शक्तीचा विकास होऊं शकतो ! त्यानंतर कोणाला ठाऊक, कोठून, कोणत्या स्नायुसूत्रांच्या स्फुरणांतून तिचीच छायारूप अशी स्नेहमयता उद्‌भवते ! यांपैकीं कोणतें अजर असेल, कोणतें अमर असेल ? जेव्हां या सगळ्या क्रीडापरायण बाहुल्यांचा खेळ पुरा होईल, जेव्हां त्यांच्या देहांचे अवशेष पंचमहाभूतांत मिसळून जातील, तेव्हां ती सर्व अशरीरिणी छाया काय आकाशांत मिळून जाईल कीं अधिकतर रूपांत परिस्फुटित होईल ?

तर मग कोणत्या राज्यावर मृत्यूचा अधिकार आहे ? मृत्यूच जर मानवाचा एकमात्र शेवट असेल तर या धनधान्यानें बहरलेल्या पृथ्वीचें तो काय करील ? परंतु मृत्यु सर्वजयी नाहीं, त्याचें आधिपत्य केवळ जड समष्टीवरच असतें. मानवाच्या चिंतनांतून प्रगट झालेला दैवी अग्नि मृत्यूच्या आघातानेंहि विझवला जाणार नाहीं. अमरतेचें बीज वित्तांत नसून चिंतनांत आहे. राज्याच्या केवळ विजयामुळें महासाम्राज्यें स्थापलीं गेलीं नाहींत. त्यांची प्रस्थापना चिंतन आणि दिव्य ज्ञान यांच्या प्रचारावर झालेली आहे. बावीसशें वर्षांपूर्वी भरतखंडांत महासाम्राज्याची जी स्थापना अशोकानें केली होती ती केवळ शारीरिक बल किंवा पार्थिव ऐश्वर्य यांच्या योगें झाली नव्हती. या महासाम्राज्यांत जो कांहीं संचय झाला होता तो, देण्यासाठीं, दुःख टाळण्यासाठीं व जीवांच्या कल्याणासाठीं होता. जगाच्या मुक्तीसाठीं सर्व देतां, देतां असा एक समय येऊन ठेपला कीं, जेव्हां सागरांनीं रक्षिलेल्या धरणीचा अधिपति जो अशोक त्याच्याजवळ फक्त अर्धा आंवळा शिल्लक राहिला ! त्यावेळीं हातांत तो आंवळा घेउन त्यानें म्हटलें : ' आतां हेंच माझें सर्वस्व आहे. हेंच जणूं माझ्या चरम दानरूपानें स्वीकारलें जाणार !'

## अर्घ्य

विज्ञानमंदिराच्या देहांत हें आंवळ्याचें चिन्ह कोरलेलें तुम्हांला पाहतां येईल. निष्कलंक दधीचि मुनीच्या अस्थींनीं निर्मिलेलें वज्रचिन्ह पताकारूपानें सर्वोच्च प्रस्थापित झालें आहे. जे परार्थ जीवन अर्पण करतात त्यांच्या अस्थींतूनच वज्र निर्माण होतें. त्याच्या ज्वलंत तेजानें जगांत दानवांचा नाश होतो आणि देवांची प्रस्थापना होते.





अनुक्रमणिका

## मंदिराची प्रतिष्ठापना

आज हा आंवळा आमचें अर्घ्य आहे. पूर्वीच्या काळचा महिमा महत्तर होत होत पुनर्जन्म घेईलच घेईल, या आशेनें आज आम्ही कांहीं वेळ उभे राहिलों आहोंत. उद्यांपासून परत कर्माच्या प्रवाहांत आमची जीवननौका वाहत सोडूं. आज केवळ आराध्यदेवीच्या पूजेचें अर्घ्य घेऊन आलों आहोंत. त्या देवीचें खरें स्थान बाहेर कोठेंहि नाहीं, तें हृदयमंदिरांत आहे. तिच्या पूजेचीं खरीं उपकरणें भक्ताच्या बाहुबळांत, अंतरींच्या शक्तींत आणि हृदयींच्या भक्तींत आहे.

आणि त्यानंतर साधकानें कोणत्या आशीर्वादाची आकांक्षा ठेवावी ? जेव्हां प्रदीप्त जीवन समर्पण केलें तरीहि त्याच्या साधनेची समाप्ति झालेली नसेल, जेव्हां पराजित व मुमुर्षु होऊन तो मृत्यूची वाट पाहात असेल, तेव्हां ती आराध्यदेवी त्याला आपल्या मांडीवर घेईल. अशा पराजयांच्या द्वारेंहि त्याला खरा पुरस्कार प्राप्त होईल.

---

## स्वावलंबनानेंच भारत वैभवशाली होईल

भारताचा भविष्यकाल मोठा वैभवशाली आहे असें आजकाल सर्वच लोक बोलूं लागले आहेत. पण वस्तुस्थिति अशी आहे की आम्हीं जरी राजकीय स्वातंत्र्य मिळविलें असलें, तरी अनेक मूलगामी महत्त्वाच्या गोष्टींच्या बाबतींत आम्ही अद्यापि दुसऱ्यांच्या ओंजळींनेंच पाणी पीत आहोंत.......सुमारें शंभर वर्षांच्या पाश्चात्य शिक्षणपद्धतीमुळें आपला हा भारतवर्ष आध्यात्मिक, बौद्धिक व सांस्कृतिक दृष्ट्या इतर राष्ट्रांचा गुलाम बनलेला आहे. आम्हीं स्वातंत्र्य मिळविलें असलें, तरी या तीन क्षेत्रांतील स्वातंत्र्य आम्हांस अद्यापि मिळवावयाचें आहे. आणि या तीन क्षेत्रांतील स्वराज्य जर आपण मिळवूं शकलों; तर आपलं आर्थिक स्वराज्य आपोआपच आपल्या पदरांत पडेल.......शंभर वर्षांपूर्वी अमेरिका ज्या स्थितींत होती त्याच स्थितींत आज आपण आहोंत. अमेरिकेनेंहि पहिल्यापहिल्यानें आपल्या तरुणांना शिक्षणासाठीं परदेशांत पाठविलें. परंतु त्यामुळें अमेरिकेचा उत्कर्ष घडून आला नाहीं. धनसंपन्न झालेल्या अमेरिकेच्या नागरिकांनीं अत्यंत उदार देणग्या देऊन जेव्हां मोठमोठ्या पाठशाळा, विद्यालयें व प्रयोगशाळा आपल्याच देशांतील प्रतिभावान् व्यक्तींच्या साह्यानें प्रस्थापित केल्या, तेव्हांपासूनच अमेरिकेचें बुद्धिवैभव बहरास येऊं लागलें. आणि आज शिक्षण व विज्ञान यांच्या बाबतींत अमेरिकेची बरोबरी करणारा एकहि देश जगांत उरला नाहीं. अमेरिकेनें आपल्याच पैशावर व आपल्याच बुद्धिमान् लोकांच्या साह्यानें मोठमोठ्या सांस्कृतिक व वैज्ञानिक संस्था प्रस्थापित केल्या व त्यांतून हजारों संशोधक व प्रतिभाशाली तरुण बाहेर पडले. अमेरिकेचें आजचें वैभव हें या तरुणांच्या कर्तृत्वाचें फळ होय.

—सर चंद्रशेखर वें. रमण,

जयपूर-विश्वविद्यालयाच्या पदवीदान-समारंभप्रसंगींच्या भाषणांतून

नोव्हेंबर १९४९.



अनुक्रमणिका

प्रा. वि. म. दांडेकर

# सुप्रसिद्ध संख्याशास्त्रज्ञ प्रा. प्रशान्तचंद्र महालनवीस

भारतीय शास्त्रपरिषदेच्या यंदाच्या सदतिसाव्या पुणें येथील अधिवेशनाचे अध्यक्ष प्राध्यापक प्रशान्तचंद्र महालनवीस (बंगाली उच्चार : महालानोबिस; इंग्रजी : P. C. Mahalonobis) हे एक आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संख्याशास्त्रज्ञ (Statistician) असले तरी संख्याशास्त्रज्ञांच्या बाहेर त्यांची माहिती फारच थोडया लोकांना आहे. महाराष्ट्रांत तर बहुधा यांचें नांवहि पुष्कळांच्या परिचयाचें नाहीं. फारच थोडया शास्त्रीय क्षेत्रांत हिंदुस्थान आंतरराष्ट्रीय तुलनेंत उभा राहूं शकतो. संख्याशास्त्र हें अशा प्रकारचें एक शास्त्र आहे. या अभिमानास्पद गोष्टीचें श्रेय एका व्यक्तीस द्यावयाचें झाल्यास तें सर्वस्वी महालनवीस यांस द्यावयास हवें. शास्त्रीय क्षेत्रांतील महालनवीस यांच्या जीवितकार्याचें हें थोडक्यांत सार आहे.

## पूर्वायुष्य

प्रशांतचंद्र महालनवीस यांचा जन्म कलकत्ता येथें सन १८९३ सालीं झाला. ते ब्राह्मसमाजाचे अनुयायी असून त्यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण कलकत्ता येथेंच ब्राह्मसमाजाच्या हायस्कूलमध्यें झालें. नंतर कलकत्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांतून सन १९१२ सालीं ते बी. एस्‌सी. होऊन उच्च शिक्षणाकरितां केंब्रिज येथें गेले. १९१४ सालीं त्यांनीं केंब्रिज विश्वविद्यालयाची गणिताची पदवी-परीक्षा (Tripos) दिली. पुढील वर्षी त्याच विद्यालयाच्या निसर्गशास्त्राच्या (Natural Science, Part II) परीक्षेंत ते प्रथमश्रेणींत उत्तीर्ण झाले. त्यानंतर दोन वर्षे त्यांची केंब्रिजच्या किंग्ज कॉलेजमध्यें सीनिअर रीसर्च स्कॉलर म्हणून नेमणूक झाली. त्यानंतर १९१७ सालीं हिंदुस्थानांत परत आल्यानंतर ते हिंदुस्थानसरकारच्या शिक्षणखात्यांत (I. E. S.) शिरले. आणि कलकत्ता विद्यापीठ व प्रेसीडेंसी कॉलेज यांमध्यें पदार्थविज्ञाना-(Physics)चे प्राध्यापक म्हणून काम करूं लागले. १९१८ सालीं त्यांनीं केंब्रिजची एम्. ए. ही पदवी घेतली. तेव्हांपासून आजपर्यंत ते प्रेसिडेंसी कॉलेजांत पदार्थविज्ञानाचे प्राध्यापक म्हणूनच आहेत.

## संख्याशास्त्र

सन १९०० पासून १९२० पर्यंत म्हणजे प्राध्यापक महालनवीसांचें बालपण आणि विद्याभ्यास पूर्ण होईपर्यंत इंग्लंडमध्यें संख्याशास्त्र (Statistics) या नवीन शास्त्राचा उदय होत होता. मेंडेलच्या आनुवंशिकतेसंबंधींच्या संशोधनाचें पुनःसंशोधन झाल्यानंतर प्राणिशास्त्र (Biology), वंशशास्त्र (Eugenics), अनुवंशशास्त्र (Genetics) इत्यादी शास्त्रांच्या संशोधनाची एक लाट इंग्लंडमध्यें आली. याच शास्त्रांच्या अनुषंगानें आणि ह्या शास्त्रांना सहायभूत म्हणून संख्याशास्त्रामध्येंहि संशोधन सुरू झालें. लंडन विश्वविद्यालयाचे एक प्राध्यापक (आतां ख्रिस्तवासी) कार्ल पिअर्सन यांना इंग्लंडमध्यें या शास्त्राचा प्रणेता म्हणतां येईल त्यांनीं सन १९०० मध्यें Biometrics नांवाचें त्रैमासिक सुरूं करून संख्याशास्त्राच्या संशोधनास विलक्षण चालना दिली. थोड्याच अवधींत अनेक शास्त्रज्ञ आणि विद्यार्थी या विषयांत संशोधनकार्य करूं लागले. सन १९१५ च्या सुमारास लंडन्-विद्यापीठाचे दुसरे एक प्राध्यापक (सध्यां केंब्रिज विद्यापीठांत असलेले) रोनाल्ड फिशर याच क्षेत्रांत










अनुक्रमणिका

दिरिशेनें पडले. १९२० चे सुमारास कार्ल पिअर्सन आणि फिशर यांच्या तात्विक भूमिकेंत फरक पडून संख्याशास्त्राच्या संशोधनांत एक नवीनच जिवंतपणा येऊं लागला. याच सुमारास प्रा. कार्ल पिअर्सन यांचें कांहीं लिखाण वाचनांत आल्यामुळें प्रा. महालनविस यांना संख्याशास्त्रसंबंधीं जिज्ञासा उत्पन्न झाली. आणि त्यांनीं एकाकी या विषयाच्या अभ्यासास सुरुवात केली. थोड्याच अवधींत त्यांची डॉ. आमन्‌—त्यावेळचे हिंदुस्थानच्या प्राणिशास्त्रीय पहाणीचे संचालक ( Director, Zoological Survey ) यांच्याशीं गांठ पडली. त्यांच्या प्रेरणेनें प्रा. महालनवीस यांनीं सन १९२२ मध्यें संख्याशास्त्राच्या दृष्टिकोनांतून हिंदुस्थानांतील वंश, जाती इत्यादींसंबंधीं लेखनास सुरुवात केली. त्याच सुमारास त्यांची त्यावेळचे वेधशाळांचे प्रमुख संचालक ( Director-General of Observatories ) सर गिल्बर्ट वॉकर यांच्याशीं गांठ पडली. सर वॉकर यांना हवामानशास्त्रांत संख्याशास्त्राचा उपयोग व्हावा अशी फार इच्छा असे आणि त्या दृष्टीनें त्यांनीं स्वतःहि बरेंच महत्त्वपूर्ण संशोधन केलें. त्यांच्याशीं निकटचा सहवास येऊन प्रा. महालनवीस यांनीं १९२३ मध्यें हवामानशास्त्रांतील संख्याशास्त्राच्या उपयोगासंबंधीं लेखनास सुरुवात केली. हळू हळू निरानिराळ्या क्षेत्रांतील अभ्यासू आणि संशोधक महालनवीस यांचा संख्याशास्त्रीय सल्ला घेऊं लागले. १९२२ मध्यें उत्तर बंगाल्यांत महापूर होऊन अतोनात नुकसान झालें होतें. त्यांसंबंधीं एक अत्यंत परिश्रमपूर्ण, अति महत्त्वाचें असें संशोधन करून प्रा. महालनवीस यांनीं १८७३ ते १९२२ मधील उत्तर–बंगालांतील पर्जन्य आणि महापूर या नांवानें एक सविस्तर अहवाल प्रांतिक सरकारास सादर केला.

### भारतीय संख्याशास्त्र-संशोधन संस्था

याप्रमाणें प्रा. महालनवीस यांची संख्याशास्त्रांतील हालचाल आणि अभ्यास त्यांच्या स्वतःच्या खाजगी खर्चानेंच आणि प्रेसिडेंसी कॉलेजच्या पदार्थविज्ञान विभागांतच हळू हळू विस्तृत होत होता. सन १९३१ मध्यें भारतीय कृषिसंशोधन-परिषदे- (Imperial आतां Indian Council of Agricultural Research) नें त्यांना एक लहानशी देणगी दिली. त्यांतून त्यांनीं संख्याशास्त्रीय सल्ला देणारी अशी Statistical Laboratory म्हणून संस्था सुरू केली. थोड्याच दिवसांत Indian Statistical Institute ही संस्था स्थापन होऊन १९३३ मध्यें संख्याशास्त्रीय संशोधनास वाहिलेलें असें 'संख्या' नांवाचें इंग्रजी त्रैमासिक सुरू झालें. प्रथमच म्हटल्याप्रमाणें संख्याशास्त्राच्या क्षेत्रांत इतर राष्ट्रांच्या तुलनेनें उभा रहाण्यास हिंदुस्थान आज जो कांहीं प्रमाणांत समर्थ आहे, त्याचें सर्व श्रेय या घटनाना आहे.

संख्याशास्त्राच्या अभ्यासास आणि संशोधनास एकसूत्री वळण मिळावें या हेतूनें १९३५ मध्यें अभ्यासक्रम आंखून त्यांनीं या शास्त्रांत शिक्षणाची सोय केली आणि १९३६ मध्यें या विषयांत प्रमाणपत्रें देण्याकरितां दोन परीक्षा सुरू केल्या. याबाबतच्या प्रा. महालनवीस यांच्या कल्पना मात्र व्हाव्या तशा सफल झाल्या नाहींत, असें म्हटलें पाहिजे. १९४१ सालीं कलकत्ता–विद्यपीठानें संख्याशास्त्रांत एम्. ए. किंवा एस्. एस्सी. पदवी देण्याचें ठरवून दोन वर्षांचा अभ्यासक्रम आंखून संख्याशास्त्राकरतां स्वतंत्र विभाग सुरू केला. याबाबत प्रा. महालनवीस उदासीन होते. परंतु त्यांची विशेष इच्छा नसतांहि तेच या विद्यापीठाच्या संख्याशास्त्रविभागाचे प्रमुख झाले. हळूं हळूं हिंदुस्थानांतील इतर विद्यापीठांतहि संख्याशास्त्राचे अभ्यासक्रम सुरू झाले. या सर्वांचा परिणाम म्हणून Indian Statistical Institute च्या प्रमाणपत्रपरीक्षा मागें पडल्या. त्यामुळें सहाजिकच या विषयाच्या अभ्यासक्रमांत आवश्यक तो एकसूत्रीपणा राहूं शकला नाहीं. परंतु याहि परिस्थितींत प्रा. महालनवीस यांनीं प्रमाणपरीक्षा बंद न पडूं देतां चालूं ठेवल्या, आणि त्यांचा दर्जा कमी होऊं दिला नाहीं. सर्वच विद्यपीठांतून एम्. ए. पदवी घेतलेले संख्याशास्त्रज्ञ भराभर बाहेर पडूं लागले म्हणजे Indian Statistical Institute च्या प्रमाणपरीक्षेस पुनः एकदा








उच्च स्थान प्राप्त होऊन या विषयांत एकसूत्रीपणा येऊं लागेल असा भरंवसा आहे.

हिंदुस्थानांतील विद्यार्थी आणि संशोधक कार्यकर्त्यांना संख्याशास्त्रांतील परदेशीय तज्ज्ञांच्या ज्ञानाचा लाभ आणि त्यांचा सहवास लाभावा म्हणून प्रा. महालनवीस यांनीं परदेशीय तज्ज्ञांना आमंत्रण करून त्यांचीं व्याख्यानें हिंदुस्थानांत करण्याचा प्रघात सुरू केला. याप्रमाणें प्रथम १९३८ मध्यें इंग्लंडमधील या विषयाचे प्रमुख नेते प्राध्यापक रोनाल्ड फिशर यांना त्यांनीं आमंत्रण दिलें. त्याच निमित्तानें प्रा. फिशर यांच्या अध्यक्षतेखालीं पहिली भारतीय संख्याशास्त्रीय परिषदहि भरविली. त्यानंतर सालोसाल ही परिषद् स्वतंत्र रीतीनें भरत असे. थोड्या वर्षांपूर्वी भारतीय शास्त्रीय परिषदेमध्येंच संख्याशास्त्रास स्वतंत्र स्थान मिळालें. यंदा तर भारतीय शास्त्रीय परिषदेचें अध्यक्षपद प्रा. महालनवीस यांना मिळून एकप्रकारें संख्याशास्त्रासच एक नवीन प्रामाण्य मिळालें आहे.

## आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संशोधक

संख्याशास्त्रांत प्रा. महालनवीस यांचें स्वतःचें संशोधन मुख्यतः दोन प्रकारचें आहे. पहिल्या प्रकारांत येणारे विषय उदाहरणानें सांगणें सोपें होईल. समजा, पुण्यांत असलेल्या अनेक विद्यालयांचे त्यांतून मॅट्रिकला बसणाऱ्या विद्यार्थ्यांच्या निकालावरून बरेवाईट असे गट पाडावयाचे आहेत; जसें पहिल्या प्रतीचीं, दुसऱ्या प्रतीचीं विद्यालयें... याप्रमाणें मॅट्रिकला बसणाऱ्या विद्यार्थ्यांचा निकाल पहातांना एखादाच विषय, किंवा सर्व विषय यांत मिळून मिळालेले एकूण गुण एवढेंच लक्षांत घेतलें तर विद्यालयांची प्रतवारी लावणें सुलभ आहे. परंतु मॅट्रिकला असलेल्या सातहि विषयांत मिळालेल्या गुणांचा निरनिराळा विचार करून असे क्रम किंवा प्रतवारी लावणें हें बरेंच अवघड आहे. अशा तऱ्हेचे प्रश्न हाताळण्याचें एक संख्याशास्त्रीय तंत्र प्रा. महालनवीस यांनीं पुढें मांडलें. महालनवीस यांच्या मूळ कल्पनांवर बरेंच संशोधन आणि गणित करून त्यांचेच विद्यार्थी आणि सहकारी यांनीं तें तंत्र आता जवळ जवळ पूर्णावस्थेस आणलं आहे. महालनवीस यांच्या कार्याचें दुसरें क्षेत्र म्हणजे कोणत्याही आर्थिक वा सामाजिक प्रश्नासंबंधीं आंकडेवारी मिळवावयाची झाल्यास शक्य तितक्या थोड्या खर्चात अधिकांत अधिक उपयुक्त माहिती कशी मिळवावी यासंबंधींचें संख्याशास्त्रीय तंत्र हें होय. फाळणीपूर्वे बंगाल्यांत जूट हें एक फार महत्त्वाचें पीक होतें. आणि दरवर्षी त्याची लागवड किती क्षेत्रावर झाली आहे, यासंबंधीचे अंदाज प्रांतिक सरकारास मिळणें आवश्यक होतें. बंगाल्यांत कायमधारापद्धतीमुळें गांवोगांवी तलाठी किंवा कुलकर्णी नाहींत. त्यामुळें कोणत्या पिकाखालीं किती क्षेत्र आहे, यासंबंधींचे आंकडे प्रांतिक सरकारास मिळणें दूरापास्त होतें.

शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें, साऱ्या प्रांतभर नमुन्यादाखल कांहीं शेतें निवडून तेवढ्याचीच पहाणी करून साऱ्या प्रांतांत जूटखालीं एकूण किती क्षेत्र असेल याचे अंदाज बांधण्याचें तंत्र प्रा. महालनवीस यांनीं बसविलें. नमुन्यादाखल निवडावयाचीं शेतें किती निवडावीं, कशीं निवडावीं इत्यादीं संबंधीं प्रश्नांवर त्यांनीं संख्याशास्त्रीय महत्त्वाचें संशोधन केलें. या संशोधनाचा अतोनात गौरव होऊन इंग्लंडमधील रॉयल ए.सोसायटीनें सन १९४९ मध्यें त्यांची 'फेलो' म्हणून निवड करून त्यांचा बहुमान केला.

१९४५ मध्यें रॉयल ए. सोसायटीची फेलोशिप मिळाल्यापासून प्रा. महालनवीस यांना आंतरराष्ट्रीय स्थान मिळालें. १९४६ पासून ते राष्ट्रसंघाच्या निरनिराळ्या संख्याशास्त्रीय सभांवर सभासद वा अध्यक्ष म्हणून काम करीत आहेत. गेल्या दोन वर्षांत या निमित्तानें त्यांनीं पृथ्वीच्या पाठीवरील बहुधा साऱ्या देशांत संचार केला आहे. ऑस्ट्रिया, बेलजियम, बल्गेरिया, कानडा, सिलोन, झेकोस्लोव्हाकिया, डेन्मार्क, ईजिप्त, फ्रान्स, जर्मनी, ग्रीस, हंगेरी, इटली, मेक्सिको, नॉर्वे, हॉलंड, पॅलेस्टाईन, रुमोनिया, स्वीडन, स्वित्सर्लंड, तुर्कस्थान, इंग्लंड, अमेरिका, युगोस्लाव्हिया, ब्रह्मदेश इत्यादि सर्व राष्ट्रांना राष्ट्रसंघातर्फे संख्याशास्त्रीय सल्लागार म्हणून त्यांनीं भेटी दिल्या आहेत. याशिवाय अमेरिकेंतील बहु-








## सुप्रसिद्ध संख्याशास्त्रज्ञ प्रा. प्रशान्तचंद्र महालनवीस

तेक सर्व महत्त्वाचीं विद्यापीठें यांमधून तशींच इतरत्रहि अनेक विद्यापीठांतून त्यांनीं याविषयीं व्याख्यानेंहि दिलीं आहेत. याप्रमाणें गेलीं दोनतीन वर्षें ते अखंड जागतिक दौरा करीत असून आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळवीत आहेत.

### शास्त्रज्ञाचा रूक्षपणा नाहीं

प्रथम पदार्थविज्ञान आणि नंतर संख्याशास्त्र यांतच बहुधा त्यांचा काल गेलेला असला तरी शास्त्रज्ञाचा रूक्षपणा प्रा. महालनवीसांमध्यें नाहीं. त्यांचें खाजगी ग्रंथालय हें बहुधा वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांवरील ग्रंथांनीं भरलेलें आहे. ब्राह्मसमाजाचे कार्यकारी सभासदत्व आणि कै. रवींद्रनाथ ठाकूर यांचा निकट सहवास यांमुळें त्यांचें खाजगी जीवन विशेष साधें व सुंदर झालें आहे. सन १९२१ ते १९३१ पर्यंत ते रवींद्रनाथांच्या 'विश्वभारती'चे कार्यवाह होते. त्यामुळें रवींद्रनाथांचा फारच निकट सहवास त्यांना दीर्घ काल लाभला. त्याचा त्यांच्या जीवनमूल्यांवर चिरंतन परिणाम झाला आहे. नुकताच ऑक्टोबरमध्यें मी कलकत्यास गेलों असतांना त्यांनीं भारतीय शास्त्रीयपरिषदेच्या पुणें अधिवेशनाची सिद्धता कशी काय होत आहे यासंबंधीं चौकशी केली आणि येथील स्थानिक कार्यवाहांना निरोप म्हणून सांगितला कीं कोणत्याही प्रसंगीं राष्ट्रगीत व्हावयाचें तें अत्यंत गंभीर रीतीनें व्हावयास हवें, राष्ट्रगीत सुरूं होण्यापूर्वी कांहीं काल वाद्यवादनाचे सूर ऐकूं येतात ते येऊं नयेत, तर ठोक्याबरोबर एकदम राष्ट्रगीत सुरूं व्हावें इत्यादि.

सौ. राणी महालनवीस या सुशिक्षित, बहुश्रुत आणि मधुरभाषी असून प्रा. महालनवीस यांचा सर्वत्र सतत पाठपुरावा करतात. परमेश्वरी कृपेनें दोघांनाहि उत्तम शरीरप्रकृतीची देणगी असून संयमित राहाणीनें दोघांनींहि ती कायम जतन करून ठेविली आहे. या संसारसुखांत सामान्य दृष्टीनें न्यून इतकेंच कीं त्यांना अपत्यसुख नाहीं. परंतु दोघांनींहि कार्यांचा आणि कार्यक्रमाचा एवढा व्याप करून ठेवला आहे कीं, सामान्य दृष्टीला दिसणाऱ्या या न्यूनाची जाणीव दोघांनाहि होत असावी असें वाटत नाहीं.

---

## खांडेकरांची पहिली कादंबरी

श्री. वि. स. खांडेकर यांचा '**वसंत**'च्या दिवाळीच्या अंकांत 'माझी पहिली कादंबरी' या शीर्षकाखालीं लेख आला असून त्यांत 'हृदयाच्या हांके'चा जन्म कसा झाला याचें त्यांनीं आपल्या नेहमीच्या मनोवेधक शैलीनें वर्णन केलें आहे. 'मी कादंबरीकार कसा झालों हें अजून मला एक मोठें कोडें आहे...आपण लेखक व्हायचें म्हणजे नाटककारच व्हायचें असें लहानपणापासून वाटूं' लागल्याचें सांगून अजूनही नाटकाचें त्यांना किती जबरदस्त आकर्षण आहे हें सांगतांना या आकर्षणाची त्यांनीं कारणमीमांसा केली आहे. "कादंबरी कितीही चांगली असली तरी मनुष्य ती एकांतांत वाचतो. एका जीवाच्या त्या जगांत कल्पना व भावना यांच्या जोडीनें त्याची विचारशक्तिही जागृत असते. नाटकगृहांत आणि चित्रमंदिरांत प्रेक्षकावर चिकित्सक बुद्धीपेक्षां तरल भावनेचा पगडा अधिक बसतो. तो नकळत तिथल्या गर्दीतला एक घटक होतो.... राजकारणाप्रमाणें दृश्य काव्यांतही समाजमना-(Mass Mentality)चेंच प्रस्थ अधिक असतें". पुढें पहिल्या कादंबरीच्या निर्मितीला आंतल्या उमाळ्यापेक्षां बाह्य परिस्थितीच कशी अधिक कारणीभूत झाली, श्री. खानोलकर यांच्या भिडेखातर भारत-गौरव-ग्रंथमालेकरितां कादंबरी लिहायला आपण कसा होकार दिला, पुढें कादंबरीलेखन कसें साधेना, शेवटीं पत्नीच्या कुडयांचें ध्येय ठेवून कादंबरी लेखनाच्या पूर्वतयारीला कशी सुरुवात केली, कादंबरीचें कथानक व पात्रें जुळतांना कशा प्रसूतिवेदना झाल्या याचें वर्णन करून शेवटीं ते लिहितात: "दोन गोष्टींमुळें ती पहिली कादंबरी मला आवडते. पहिली, तिच्यामुळें माझ्यासारखा दरिद्री शिक्षक बायकोची कुडयांची हौस भागवूं शकला. दुसरी, मीं ती माझ्या वडिलांना अर्पण केली आहे."








डॉ. मो. वा. चिपळूणकर

# भारतीय शास्त्रीय परिषदेचीं तीन तपें

यंदाचे वर्षी[1] भारतीय शास्त्रीय परिषदेचें ३७ वें अधिवेशन पुणें येथें भरविण्याचा योग प्रथमच येत असल्यामुळें पुणेंकरांना व एकंदर महाराष्ट्रांतील सुशिक्षितांना सुद्धां त्याबद्दलचें कुतूहल वाटणें अगदीं स्वाभाविक होय. तेव्हां यानिमित्तानें ह्या परिषदेचा स्थापन झाल्यापासूनचा एकंदर ३६-३७ वर्षांचा इतिहास मराठी वाचकांसाठीं मुद्दाम येथें देण्याचें योजलें आहे.

## परिषदेचे उद्देश व घटना

ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानांत ज्या अनेक उत्तम गोष्टी प्रथम आपल्या स्वतःच्या फायद्यासाठीं म्हणून सुरू केल्या व अखेर त्या भारतीयांच्या हातीं आल्या त्यांपैकींच भा. शा. परिषद् हीहि एक होय असें म्हणावयास हरकत नाहीं; कारण ही परिषद् मुख्यतः प्रो. मॅक्महोन (लखनौ) व प्रो. सायमॉन्सेन (मद्रास) ह्या दोघां परकीय रसायनशास्त्रज्ञांच्या खटपटींनेंच इ. स. १९१३ सालीं कलकत्त्यास स्थापिली गेली. शिवाय पाहिलीं १०-१२ वर्षें तरी तिच्या कार्यांत परकीयांचाच हात अधिक होता असें दिसून येतें. सुरुवातीचें तिचें कामकाज कलकत्त्याच्या 'एशिॲटिक सोसायटी ऑफ् बेंगॉल' ह्या संस्थेमार्फत चालत असे व पुढें मात्र "इंडियन सायन्स कॉंग्रेस असोसिएशन्" (भारतीय शास्त्रीय परिषद्) या नांवाचा एक स्वतंत्र संस्था स्थापिली गेली. इ. स. १९३८ पर्यंत एशिॲटिक सोसायटीतर्फे हिचें सर्व प्रकाशन होत असे. पण १९३९ पासून ते हिच्या नांवानें स्वतंत्रपणें होऊं लागलें.

परिषद् स्थापन करणारांच्या कल्पनेनुसार त्यावेळीं तिचें ध्येय पुढीलप्रमाणें ठरविण्यांत आलें : "शास्त्रीय संशोधनाला जोराची चालना देऊन आणि व्यवस्थित वळण लावून देशांतील निरनिराळ्या शास्त्रीय संस्था व व्यक्ती यांचें सहकार्य घडवून आणणें, शास्त्रांच्या शुद्ध व प्रयुक्त विभागांच्या उद्देशांकडे लक्ष वेधणें व शास्त्रीय संशोधनाच्या आड येणारे कोणतेहि सार्वजनिक प्रकारचे अडथळे काढून टाकणें". आजच नव्हे तर बऱ्याच वर्षांपासून या परिषदेचें कार्य वरील उद्देशानुसार चाललें आहे असें म्हणतां येत नाहीं. तिच्या घटनेंतहि बराच फेरफार घडून आल्यामुळें म्हणा, किंवा तिचा एकंदर व्याप वाढल्यामुळें अगर इतर कोणत्याहि कारणामुळें म्हणा, वरील ध्येय आज पूर्णतया अनुसरलें जात नाहीं. आजचें तिचें एकमेव कार्य म्हणजे दरवर्षी फक्त एकदा सर्व हिंदी शास्त्रज्ञांचें संमेलन भरवून त्याचा इत्थंभूत वृत्तांत प्रसिद्ध करणें एवढेंच झालें आहे.

भा. शा. परिषदेची मूळची घटना आजपर्यंत अनेकदां थोडी थोडी बदलण्यांत आली आहे. तिची आजची घटना येथें थोडक्यांत दिली आहे:

---

[1] ह्या लेखाकरितां लागणारी माहिती गोळा करतांना आणि हा लेख लिहितांना श्री. ए. व्यं. मराठे बी. एस्सी. यांचें जें बहुमोल साहाय्य झालें आहे, त्याचा आनंदानें कृतज्ञतापूर्वक निर्देश करतों.—लेखक








# भारतीय शास्त्रीय परिषदेचीं तीन तपें

याहिपुढें बदलत्या कालानुसार तिच्यांत कितीतरी महत्त्वाचे बदल होण्याची आवश्यकता आहे हें दिसून येईलच; व तसे कांहींचे प्रयत्न सुद्धां चालू आहेत हें प्रथमच सांगितलेलें बरें. दरवर्षी १५ जुलैच्या आंत बारा रुपये वार्षिक वर्गणी देणारा कोणताही इसम परिषदेचा साधारण सदस्य होतो. त्याचप्रमाणें कांहीं ठराविक रक्कम एकदम दिल्यास परिषदेचे देणगीदार, आजीव आणि प्रोत्साहक सदस्य होतां येतें. कांहीं व्यक्तींना त्यांच्या विशेष स्पृहणीय शास्त्रीय कामगीरीकरतां कायमचे माननीय सदस्य निवडून परिषद् त्यांचा गौरव करते. अशा सदस्यांची कोणत्याही वर्षी एकंदर संख्या पंधरापेक्षां अधिक होतां कामा नये व एका वर्षी एकाहून अधिक माननीय सदस्य निवडतां येत नाहींत असा नियम आहे. या सर्व सदस्यांची मिळून परिषदेची साधारण सभा दर वर्षी अधिवेशनाच्या वेळीं भरते व त्यामधूनच अनेक मंडळें अथवा समित्या निवडल्या जातात. परिषदेचें सर्व मुख्य कामकाज पाहणारी कार्यकारिणी असते. परिषदेचे व अधिवेशनाचे अध्यक्ष, दोन चिटणीस (पैकीं एक कलकत्याचा रहिवासी), एक खजिनदार आणि दहा निवडून आलेले साधारण सदस्य असे मिळून १५ जणांचें हें कार्यकारी मंडळ बनतें. अधिवेशनापुरता दर ठिकाणच्या दोन स्थानिक चिटणिसांचा समावेश केला जातो. याहून एका मोठ्या मंडळाची—कौन्सिलची—निवड त्याच वेळीं करण्यांत येते. त्यामध्यें कार्यकारिणीचे सर्व सदस्य असून शिवाय पूर्वीचे सर्व मुख्य अध्यक्ष, चिटणीस, खजिनदार, त्या वर्षाच्या अधिवेशनाचे सर्व विभागीय अध्यक्ष व खास निवडून आलेले सात साधारण सदस्य असतात. कौन्सिलकडे कांहीं तात्पुरत्या तांत्रिक गोष्टी करण्याचें व कार्यकारिणीला वेळोवेळीं सल्ला देण्याचें एवढेंच काम असतें. नेहमींच्या पैशाच्या व्यवहारासाठीं म्हणून, परिषदेचे दोन चिटणीस एक खजिनदार व कार्यकारिणीनें नेमलेला एक साधारण सदस्य (कलकत्याचा रहिवासी) असे मिळून चार जणांचें एक स्वतंत्र निधि-मंडळ असतें. शिवाय केवळ अधिवेशनाच्या कामासाठीं म्हणून प्रत्येक विभागाची एकएक स्वतंत्र समिति निवडली जाते. तींतील सदस्यांची संख्या अमर्याद व सतत फुगत जाणारी असते! त्यांच्याकडे सोपविलेलें काम मात्र अगदींच गौण असतें.

वरील प्रकारच्या सदस्यांखेरीज़ अधिवेशनाचे संपूर्ण सभासद, सहकारी सभासद आणि विद्यार्थी सभासद असे आणखी तीन प्रकारचे सभासद असतात. त्यांना मत नसून परिषदेच्या कोणत्याही अधिकारपदावर निवडून येतां येत नाहीं. त्यांना फक्त त्या वर्षाच्या अधिवेशनांतच भाग घेतां येतो. संपूर्ण सभासदांना सगळें व इतरांना फक्त निबंधांचे सारांश असलेलें त्या वर्षाचें प्रकाशन फुकट मिळतें.

## परिषदेची वाढ

गेल्या ३६ वर्षांत विभाग, निबंध, चर्चा व सदीप व्याख्यानें या सर्वांची संख्या सतत वाढत गेली आहे. पहिल्या वर्षी (१९१४), सभासदांची संख्या १०६ होती. ती २४ व्या वर्षी (१९३७), ८१० पर्यंत गेली. रौप्यमहोत्सवाच्या (१९३८) वर्षी तर ती २१०० पर्यंत गेली. त्यानंतर ती एकंदरींत सरासरी १००० ते १५०० राहिली आहे. शिवाय आजपर्यंत ३६—३७ वर्षांत तिचीं अधिवेशनें एकदांहि खंड न पडतां दर वर्षी भरत आलीं आहेत. सुरुवातीपासूनच तिला अखिल भारतीय स्वरूपाचें जरी नांव दिलें असल—व तसा तिच्या मूळ संस्थापकांचा प्रयत्नही होता—तरी तिला खरें भारतीय स्वरूप बऱ्याच अलीकडे आलेलें दिसतें.

हिंदुस्थानांतील जवळ जवळ एकही अशी शास्त्रीय संस्था राहिलेली नाहीं कीं जिच्यांतील व्यक्तींनीं भा. शा. परिषदेच्या कार्यांत कधीं भाग घेतलेला नाहीं! त्या कारणानें अर्थातच शास्त्रीय म्हणून गणलेला प्रत्येक विषय येथें हाताळला गेल्याची खूण सांपडते. चर्चा व सदीप व्याख्यानांचे विषयांतही अशीच संपूर्ण विविधता आढळून येते. भा. शा. परिषदेची मुख्य व कायम उत्पन्नाची बाब म्हणजे तिचे वर्गणीदार हेच होय. आणखी दुसरी म्हणजे वेळोवेळीं सरकार, विद्यापीठें,

कारखानदार इत्यादींकडून विवक्षित कार्याकरतां मिळालेल्या लहानमोठ्या देणग्या ही होय. तथापि तिला अजून स्वतःची एखादी स्वतंत्र इमारत कांहीं उभारतां आलेली नाहीं.

लेखांच्या शेवटीं दिलेल्या कोष्टकांत, मुख्य व विभागीय अध्यक्ष, चर्चा आणि सदीप व्याख्यानें यांचे वक्ते या सर्वांची बंगाली, मद्रासी, महाराष्ट्रीय, युरोपिअन् व इतर अशा पांच गटांत विभागणी करून दाखविली आहे. त्यावरून स्थूलमानानें पुढील उद्बोधक अनुमानें काढावयास मुळींच हरकत नाहीं. परिषदेच्या कार्यांत सुरुवातीचीं कांहीं वर्षें तरी ब्रिटिश शास्त्रज्ञांचें वर्चस्व होतें, व पुढें बंगाली, मद्रासी असे निरनिराळ्या प्रांतांतील लोक त्यांत अधिकाधिक शिरत गेले. इ. स. १९३५पर्यंत देखील परकीय शास्त्रज्ञांचें महत्त्व फार होतें. त्याचप्रमाणें आजपर्यंत येथें बंगाली लोकांचेंच आधिक्य सर्व बाबतींत दिसून येतें. महाराष्ट्रीय शास्त्रज्ञांनीं आपली बाजू फारशी सावरलेली दिसत नाहीं. परिषदेच्या विभागाच्या संख्येंतील बदल आणि त्यामुळें अधून-मधून झालेली परस्परसंबद्ध विषयांची सरमिसळ यामुळें अथपासून इतिपर्यंत एकसूत्रीपणा राखून आजवर परिषदेपुढें आलेल्या निबंधांची विषयानुसार वर्गवारी नीट करतां आली नाहीं. तथापि बहुतेक अधिवेशनांतील असा अनुभव आहे कीं हिंदुस्थानांत रसायनविषयक निबंध सर्वांत अधिक लिहिले जातात. तरीपण हिंदी पदार्थविज्ञान-शास्त्रज्ञ आणि हिंदी गणिती यांनींच जगांतील शास्त्रीय ज्ञानांत महत्त्वाची भर टाकिली आहे असें दिसून येतें. उदाहरणार्थ, नोबेल पारितोषिक सर सी.व्ही.रामन् या पदार्थविज्ञानशास्त्रज्ञास मिळालें असून आतापर्यंत इंग्लंडच्या रॉयल सोसायटीच्या सदस्यत्वाचा बहुमानहि इतरांपेक्षा अधिक पदार्थ-विज्ञानशास्त्रज्ञांनींच मिळविला आहे.

## भारतीय शास्त्रीय परिषदेचा रौप्यमहोत्सव

इ. स. १९३८ च्या जानेवारी दि. ३ पासून दि. ९ पर्यंत भा. शा. प.चा रौप्यमहोत्सव कलकत्ता येथें मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. त्यावेळीं सर्व हिंदुस्थानांतून अनेक शास्त्रज्ञ व शास्त्रीय विषयांसंबंधीं आस्था बाळगणारे असंख्य लोक आले होते. या प्रसंगानिमित्त जी सर्वांत महत्त्वाची व अंतिमफलदायी गोष्ट करण्यांत आली होती ती म्हणजे अदमासें पाउणशें ब्रिटिश व इतर परकीय ख्यातनाम शास्त्रज्ञांना या रौप्यमहोत्सवाचें खास निमंत्रण देण्यांत आलें होतें; व शिवाय अधिवेशनाचें मुख्य अध्यक्षपद जगप्रसिद्ध ब्रिटिश शास्त्रज्ञ लॉर्ड रूदरफोर्ड यांना देण्यांत आलें होतें. दुर्दैवानें अधिवेशनाच्या किंचित् अगोदर (१९ ऑक्टो. १९३७ ला) लॉर्ड रूदरफर्ड आकस्मिकपणें कालवश झाले. तेव्हां त्यांच्या जागीं इंग्लंडचे दुसरे तितकेच जगप्रसिद्ध शास्त्रज्ञ सर जेम्स जीन्स यांची ताबडतोब निवड करण्यांत आली. भा. शा. प. च्या निमंत्रणाचा स्वीकार करून जे ब्रिटिश व परकीय शास्त्रज्ञ येथें आले होते, त्यांनीं नंतर सबंध हिंदुस्थान-भर दौरा काढून निरनिराळ्या शहरीं अनेक संस्थांना भेटी दिल्या व अनेक ठिकाणीं उत्कृष्ट भाषणें, चर्चा, व संभाषणेंही केलीं. त्यावेळीं हिंदुस्थानांतील अनेक विद्यापीठांनीं व संस्थांनीं त्यांना आपल्यांत बोलावून सन्मान्य पदव्या देऊन किंवा अन्य तऱ्हेनें त्यांचा सत्कार व गुणगौरव केला. अशा तऱ्हेनें त्या वर्षीं येथील होतकरूंच काय पण अनेक लहानमोठ्या शास्त्रज्ञांनाही त्यांच्या भेटीचा फायदा झाला हें निर्विवाद होय. आणि या अनुभवा-मुळेंच अलीकडे युद्धानन्तर दर अधिवेशनाला मोठमोठ्या परदेशीय शास्त्रज्ञांना हजर रहाण्याचीं निमंत्रणें देण्याची प्रथा पडत चालली आहे. येथें लक्षांत ठेवण्यासारखी एक महत्त्वाची गोष्ट ही कीं या निमंत्रित परदेशी पाहुण्यांच्या प्रवासखर्चासाठीं म्हणून त्या वर्षी हिंदुस्थानसरकारकडून २०,००० रु., बंगालसरकारकडून रु. १०,०००, कलकत्ता-विद्यापीठाकडून रु. १२,५००, मुंबई व उस्मानिया विद्यापठिांकडून प्रत्येकीं २००० रु. व इतर संस्था नि व्यक्ती यांकडून, मिळून एकन्दर अदमासें ४९ हजार रुपयांच्या देणग्या मिळाल्या होत्या; व त्यापैकीं बहुतेक सर्व (४६ हजारांच्यावर) त्यासाठींच खर्च करण्यात आला. याशिवाय ब्रिटिश असोशी-










एशननेंही त्यांच्यासाठीं बरीच रक्कम खर्च केली होती.

रौप्यमहोत्सवाच्या निमित्तानें आणखी एक चांगली गोष्ट झाली. ती म्हणजे हिंदुस्थानांतील एकंदर शास्त्रीयप्रगातिनिदर्शक असे तीन मोठे व माहितीपूर्ण संकलनात्मक ग्रंथ ( एक वेळेवर व दोन मागाहून ) प्रसिद्ध करण्यांत आले. ते असे : ( 1 ) An Outline of Field-Sciences of India ( एकंदर आठ लेख) ( 2 ) The progress of Science in India during the past twenty--five years ( एकंदर सतरा लेख ) आणि ( 3 ) The History of the Indian Science Congress Association.

## कांहीं अध्यक्षीय भाषणें

आजपर्यंत झालेल्या ३६ मुख्य भाषणांपैकीं ४ ५ खेरीज करून बाकी सर्व भाषणें त्या त्या शास्त्रीय विषयांवर झालीं. विभागीय अध्यक्षांची तर सर्वच तशीं होतीं. म्हणून त्या सर्वांचा परामर्श न घेतां—व तसा तो एका लेखांत घेणें अशक्य होय—फक्त या चार-पांचांचाच गोषवारा येथें देण्याचें ठरविलें आहे. आपल्या देशाच्या, किंबहुना अखिल जगाच्या, चार निरनिराळ्या अवस्थांचीं तीं उत्कृष्ट निदर्शक होत असें म्हणावयास हरकत नाहीं.

बंगालचे विद्वान् पुढारी व सुप्रसिद्ध शिक्षणप्रेमी सर अशुतोष मुखोपाध्याय ( मुकर्जी ) हे इ. स. १९१४ च्या पहिल्या अधिवेशनाचे मुख्य अध्यक्ष होते. त्यांच्या भाषणाचा विषय ' भारतीय शास्त्रीय परिषदेच्या स्थापनेचा इतिहास, उद्देश आणि स्वरूप ' असा होता. हिंदुस्थानांतील प्रथमच एकत्र जमलेल्या विद्वान् शास्त्रज्ञांचें स्वागत करून ते म्हणाले: " गेल्या दोन वर्षांपासून प्रो. मॅकमहोन व प्रो. सायमॉन्सेन् यांच्या मनांतून इग्लंडमधील ' ब्रिटिश असोशिएशन फॉर दि कल्टिव्हेशन् ऑफ सायन्स ' या संस्थेसारखी येथेंही एक संस्था चालवावी व तिचें ध्येयही तेंच असावें असें होतें. म्हणून यासंबंधीं अनेकांकडून प्रोत्साहन व अनुमति मिळाल्या-नंतर भा. शा. प.च्या उपक्रमाचा प्रस्ताव अखिल हिंदुस्थानांतील विद्वानांपुढें करण्याची संधि मिळावी म्हणून हें अधिवेशन, ' एशिॲटिक सोसायटी ऑफ बंगॉल ' या संस्थेच्या १३० व्या वार्षिक समारंभाच्या वेळीं व त्याबरोबरच होणाऱ्या, त्या संस्थेतूनच निघालेल्या ' इंडिअन् म्युझिअम् '-च्या शतसांवत्सरिक उत्सवाचे प्रसंगीं मुद्दाम घेण्यांत आलें आहे. हिंदुस्थानांत कितीतरी शास्त्रीय संस्था, सरकारी शास्त्रीय खातीं आणि विद्यापीठांच्या प्रयोगशाला आहेत. या सर्वांतील मोठमोठ्या अधिकाऱ्यांनीं व विद्वानांनीं वेळोवेळीं एकत्र जमून सहकार्यानें येथील संशोधनाची वाढ करावी. त्यासाठीं तसें वातावरणही निर्माण झालें आहे. ', असें सांगून या सर्व गोष्टी नीट योजनापूर्वक घडवून आणण्यासाठीं तेथें जमलेल्या विद्वानांना त्यांनीं आग्रहाची विनंति केली व अशा तऱ्हेनें भा. शा. परिषदेची स्थापना झाली.

इ. स. १९२१ सालचें आठवें अधिवेशन बंगालचे एक सुप्रसिद्ध उद्योगपति सर राजेंद्रनाथ मुकर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं कलकत्त्यासच भरलें होतें. ते म्हणाले : " इ. स. १९१४–१८ च्या जागतिक युद्धामुळें हिंदुस्थानसरकार व येथील कारखानदार यांना शास्त्रें व शास्त्रज्ञ यांचीं किंमत पूर्णपणें कळून आली आहे. निरनिराळ्या धंद्यांना लागणारा कच्चा माल मिळण्यासाठीं, देशांतील अन्नोत्पादनासाठीं व एकंदर जगाच्या प्रगतीसाठीं शास्त्रज्ञांना त्यांचें संशोधन चालविण्यास उत्कृष्ट प्रकारच्या सोयी करून देणें आतां अत्यंत अगत्याचें झालें आहे. खरा शास्त्रज्ञ केवळ ज्ञानलालसेनेंच संशोधन करीत असतो. त्याला धनलाभाची किंवा इतर ऐहिक गोष्टींची फारशी पर्वा नसते आणि उलट त्याच्या कार्याचा सर्वांत अधिक उपयोग तर कामगारांच्या सुखसोयी व रहाणीचें मान वाढविण्यासाठीं, त्यांना भरपूर विश्रांति मिळवून देण्यासाठीं व एकंदर जगाच्या कल्याणासाठींच खरोखरी होत असतो. शास्त्राचे नेहमीं शुद्ध आणि उपयुक्त असे दोन भाग पाडण्यांत येतात व पहिल्यास गौण लेखून त्याकडे दुर्लक्ष करतात. पण हा भेद आपल्या दृष्टिकोनाचा आहे. मूलतः तो तसा नसून







शास्त्रीय संशोधन हें अविभाज्य आहे. यासाठीं भा. शा. परिषदेनें आणि हिंदुस्थानांतील सर्व शास्त्रज्ञांनीं आपलें संशोधन-वाङ्मय सर्व लोकांस जवळजवळ फुकट वांटावें व आपल्या शोधांची जास्तींत जास्त प्रसिद्धि करावी म्हणजे त्यांच्याकडून या कार्याला खात्रीनें वाटेल तेवढें द्रव्यसाहाय्य होईल. शास्त्रज्ञ व उद्योगपती यांनीं हातांत हात घालून आपल्या प्रयत्नांनीं या देशाची व एकंदर मानवांची उन्नति घडवून आणावी असें मी एक उद्योगपति या नात्यानें आपणांस आग्रहानें सांगतों."

इ. स. १९४१ सालीं बनारस येथें भरलेल्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान अलीकडे नुकतेच निवर्तलेले सर आर्देशिर दलाल यांना देण्यांत आलें होतें. इंडिअन् सिव्हिल सर्व्हिसमधून निवृत्त झाल्यावर जमशेटपूरच्या सुप्रसिद्ध टाटांच्या कारखान्याचे ते डायरेक्टर झाले होते. त्यांची या दोन संपूर्णपणें भिन्न अशा पदांवरील कामगिरी फार वाखाणली जाते व म्हणून त्यांच्या भाषणाला त्यावेळीं दुहेरी महत्त्व प्राप्त झालें होतें. त्यांच्या भाषणाचे दोन मुख्य भाग आहेत. पहिल्यांत "शास्त्र आणि उद्योगधंदे" हा विषय त्यांनीं व्यावहारिक दृष्ट्या फारच उत्कृष्टपणें व उच्च पातळीवरून चर्चिला आहे. व दुसऱ्यांत जमशेटपूरच्या कारखान्यांचा त्यापूर्वीच्या दशकांतील संशोधनामुळें झालेल्या प्रगतीचा एकंदर आढावा घेतला आहे. दुसऱ्या जागतिक युद्धामुळें ओढवलेल्या संकटाचें दिग्दर्शन करून त्यांनीं सांगितलें : "अशा प्रसंगीं देशाचें औद्योगिक आणि आर्थिक जीवन सुरक्षित राखावयाचें असेल तर आपल्याला शास्त्रीय संशोधनाशिवाय दुसरा त्राता नाहीं; कारण बहुतेक सर्व आधुनिक उद्योगधंदे व व्यवसाय शास्त्रीयज्ञानामुळेंच निर्माण झाले आहेत व शास्त्रीय संशोधनावरच ते जगतात. कोणतेंहि आधुनिक राष्ट्र संपूर्ण औद्योगीकरणाशिवाय जगणार नाहीं. ही गोष्ट गेल्या दोन्ही जागतिक युद्धांमुळें सर्वांना इतकी निःसंदिग्धपणें पटली आहे कीं आज पुढारलेल्या सर्व राष्ट्रांत शास्त्रीय संशोधनावर भर देऊनच औद्योगीकरणाला शक्य तेवढी जोराची चालना दिली जात आहे. भारतीय शास्त्रीय परिषदेच्या रौप्य-महोत्सवाचे मुख्य अध्यक्ष लॉर्ड रुदरफर्ड यांनीं आपल्या भाषणांत म्हटलें आहे कीं, ग्रेट ब्रिटनमध्यें संशोधनासाठीं लागणाऱ्या खर्चाचा बोजा सरकार स्वतः उचलत असलें तरी त्याच्या योजनांच्या आंखणींची सर्व जबाबदारी बिनसरकारी व ख्यातनाम शास्त्रज्ञ आणि उद्योगपती यांच्या समितीवरच असते. हिंदुस्थानांतही अशी एखादी संस्था उभारावयाची असल्यास विद्यापीठें व तत्सम संस्था यांतील शास्त्रज्ञ आणि उद्योगतज्ज्ञ यांना त्यामध्यें योग्य प्रतिनिधित्व मिळावें. जे प्रश्न हातीं घ्यावयाचे असतील त्यांतील तज्ज्ञांच्याच हातीं योजनांची आखणी सर्वस्वीं दिली पाहिजे व हेंच अत्यंत महत्त्वाचें होय. ब्रिटिश व्यवस्थेंत सरकारी वातावरण मुळींच नसतें. पण त्यासाठीं खर्चिला जाणारा द्रव्यनिधि ठरविण्याची मात्र जबाबदारी सरकारवरच असते." यानंतर मोठमोठ्या हिंदी शास्त्रज्ञांनीं बरीच ओरड केल्यामुळें हिंदुस्थानांत तशी एक संस्था ताबडतोब स्थापण्यांत आली.

इ. स. १९४७ सालीं दिल्ली येथें भरलेल्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान आपल्या देशाच्या अभूतपूर्व स्थित्यंतराच्या वेळचे तात्पुरत्या हिंद सरकारचे उपाध्यक्ष पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं मंडित केलें होतें. त्यांनीं आपल्या भाषणाच्या सुरुवातीलाच असें स्पष्ट बजावून सांगितलें कीं, यापुढें केवळ अखिल मानवजातीच्या उन्नतीसाठीं व जागतिक शांततेसाठींच स्वतंत्र भारतांतील शास्त्रज्ञ जगांतील सर्व शास्त्रज्ञांशीं सहकार्य करण्यास तयार होतील. ते पुढें म्हणाले : "एकंदर मानवाच्या प्रगतीसाठीं व त्याच्या सुखसोयी वाढविण्यासाठींच मुख्यतः शास्त्रीय संशोधनाला शक्य ती मदत नि वाव देण्याचें जरी आमचें ध्येय व प्रयत्न असले तरी हिंदी शास्त्रज्ञांनीं केवळ सरकारवरच विसंबून राहूं नये; कारण सरकारी गाडा फार हळू चालत असतो. हिंदुस्थानांत शास्त्रीय प्रगति नुकतीच कोठें वाढीस लागली आहे. आजवर हिंदी कल्पकतेचा नुसता पृष्ठभाग तेवढा खरवडला गेला आहे असें म्हटलें तरी चालेल; आणि तेवढ्यानेंच अखिल जगाच्या ज्ञानांत अमूल्य भर पडली आहे. यापुढें आमच्या प्रयत्नानें शेंकडा पांच टक्के जरी हिंदी








शास्त्रज्ञांना आम्हांला उत्तम वाव देतां आला तरी आमची खात्री आहे कीं आम्ही थोडक्या अवधींतच अव्वल दर्जाच्या शास्त्रज्ञांची एक सेनाची सेनाच उभी करूं शकूं. हिंदी शास्त्रज्ञांनीं कोणाच्याही आहारीं जाऊन कोणत्याही प्रकारची हानि होईल असा आपल्या ज्ञानाचा दुरुपयोग करूं देऊं नये. अन्न, वस्त्र, निवारा, शिक्षण, आरोग्य इत्यादि अनेक मूलभूत आणि जीवनावश्यक गोष्टींची आजच्या जगाला फार वाण आहे. हिंदी शास्त्रज्ञांनीं ४० कोटी जीवांच्या दृष्टिकोनांतून पहावयास शिकलें पाहिजे. अशा विशाल दृष्टिकोणांतून बघून व आंतरराष्ट्रीय सहकार्य करूनच हिंदुस्थानांतील व अखिल जगांतील शांतता व समृद्धि यांसाठीं झटलें पाहिजे. ज्याप्रमाणें बंदुकीच्या दारूच्या शोधामुळें युरोपांतील मध्ययुगाचा अस्त झाला, त्या काळची सामाजिक व आर्थिक घडी संपूर्ण बदलली गेली व आधुनिक शास्त्रीय युगाला प्रारंभ झाला, तद्वतच नुकतीच उपलब्ध झालेली अणुशक्तीहि यापुढील नव्या युगाच्या, त्यांतील नूतन सामाजिक व आर्थिक उभारणीच्या, आगमनाची ग्वाही देत आहे! व ही नवीं घडी नीट बसल्याविना शास्त्रीय प्रगति होणें अशक्य होय असें माझें ठाम मत आहे. ''

वरील चार सारांशांवरून शास्त्रें व शास्त्रज्ञ यांकडे बघण्याचा पुढाऱ्यांचा दृष्टिकोन गेल्या चाळीस वर्षांत कसकसा बदलत गेला आहे तें सहज दिसून येतें. जो शास्त्रज्ञ निरुपयोगी व निरुपद्रवी वाटत होता तो प्रथम उपयोगी व निरुपद्रवी झाला; पुढें तो अत्यंत उपयोगी व थोडा उपद्रवी झाला; आणि अखेर तो महान् उपयोगी पण त्याचबरोबर महान् उपद्रवीहि होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे!

## कांहीं आनुषंगिक विचार

भा. शा. परिषदेचें वरील सविस्तर निवेदन हें पुष्कळ अंशांनीं हिंदुस्थानांतील या काळांतील शास्त्रीय प्रगतीचें एक उत्कृष्ट निदर्शक असलें तरी तें तेवढ्यापुरतेंच होय हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण, त्यांत येथील सर्व शास्त्रिय प्रगतीचा कांहीं अंतर्भाव झालेला नाहीं. भा. शा. परिषदेशिवाय हिंदुस्थानांत अनेक महत्त्वाच्या परिषदा, संस्था व सरकारी खातीं (कित्येक तर फार पूर्वीं स्थापन झालेलीं) आहेत.

भा. शा. प.चा एकंदर शास्त्रीय जगतांत कोणता दर्जा आहे हें ठरवितांना दोनतीन मुद्दे झटकन् डोळ्यासमोर उभे राहतात. पहिला असा कीं, बहुतेक सर्व अध्यक्षीय भाषणांचा दर्जा खरोखरीच उच्च प्रतीचा असतो; व तीं भाषणें बहुधा निरनिराळ्या शास्त्रीय शाखांतील वेळोवेळीं झालेल्या प्रगतीचा आढावा घेणारीं असल्यामुळें कांहीं वर्षें नक्की उपयोगी ठरतात. मात्र त्यांत स्वतः अध्यक्षांच्या अगदीं नवीन व महत्त्वाच्या कामगिरीचा जर कांहीं भाग ओघानेंच आला असेल तर तो प्रबंधरूपानें कोणत्या तरी सुप्रसिद्ध शास्त्रीय संशोधनाच्या नियतकालिकांत आणण्याची तो स्वतः खबरदारी घेतो. यावरून हीं अध्यक्षीय भाषणें कायम स्वरूपाचीं नव्हत, हें ते स्वतःच कबूल करतात असें सिद्ध होतें! यानंतर प्रत्येक अधिवेशनाच्या वेळीं वाचल्या (?) जाणाऱ्या निबंधांसंबंधीं बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं एक तर त्यांची संख्या (प्रत्येक विभागांतील) फार फुगत चालल्यामुळें व अनेक अवांतर कार्यक्रमामुळें ते सर्व वाचून होत नाहींत. शिवाय अधिक न्याहाळून पाहिल्यास असें दिसून येईल कीं कित्येक तर अपुऱ्या, तुटक्याफुटक्या सामग्रीवर तयार केलेले असून, भारतीय शास्त्रीय परिषदेपुढें आलेल्या त्यांच्या सारांशांच्या ' पलीकडे त्यांची मजल जातच नाहीं! या गोष्टीला आळा घालण्याचा प्रयत्न केलेला नाहीं असें म्हणवत नाहीं. पण आहे ही परिस्थिति अशी आहे. या गोष्टी उघड बोलल्या जात असून दर वर्षीं परिषदेच्या वार्षिक अहवालांत अधिवेशनाच्या वेळीं वाचलेल्या (?) सर्व निबंधांचे सारांश म्हणून हें भारूड छापलें जातें. या प्रासिद्धीला शास्त्रीय जगतांत खरोखरी फारशी किंमत नाहीं; एवढेंच नव्हे तर केवळ या कारणासाठींच भारतीय शास्त्रज्ञांना व त्यांच्या कामगिरीला शास्त्रीय जगांत गौण स्थान दिलें जातें.

मागें दिलेल्या परिषदेच्या घटनेवरून परिषदेची मुख्य समिति म्हणजे कार्यकारिणी होय हें उघड झालें असेलच. कार्यकारिणीच्या बहुतेक सर्व (एक






मुख्य खेरीज करून ) सभा कलकत्त्यासच भरतात. त्यामुळें अर्थातच बाहेरच्या सदस्यांना दरवेळीं जाऊन त्यांत भाग घेतां येत नाहीं. साहजिकच कलकत्त्याच्या स्थानिक ( बंगाली ) लोकांचें त्यांत आधिक्य आहे. एवढेंच नव्हे तर घटनेंतलि कांहीं नियमांमुळें व निवडणुकीच्या विचित्र पद्धतीमुळें तें तसें त्यांना कायम ठेवता येतें. हें उघड दिसत असूनहि इतर प्रांतीयांची एकजूट न झाल्यामुळें तीच परिस्थिति आजवर कायम आहे. या अखिल-भारतीय म्हणविणाऱ्या परिषदेला ही गोष्ट केव्हांहि विसदृश होय, अशा तऱ्हेची ओरड अलिकडे बरीच ऐकूं येते. परिषदेची वाढ अवास्तव व आवाक्याबाहेर झालेली आहे, अशा आक्षेपाच्या आडून कित्येकजणांनीं यापुढें परिषद् विभागून तिच्या चारपांच शाखा उभाराव्या अशीहि जोराची मागणी सुरू केली आहे.

आणखी एक गोष्ट लक्षांत येते, ती अशी कीं कांहीं व्यक्ती एकदां विभागीय अध्यक्ष निवडून आल्या कीं कृतकृत्य होऊन पुढें त्यांचे निबंध परिषदेकडे येईनासे, किंवा अगदीं कमी होतात; किंवा फार तर त्यांच्या विद्यार्थ्यांच्या नांवानें येतात. याचा अर्थ असाहि करतां यईल कीं त्यानंतर त्यांना भा. शा. परिषदेची पातळी कमी दर्जाची वाटूं लागते.

आजवरच्या अनेक अधिवेशनांच्या वेळच्या प्रत्यक्ष अनुभवावरून व अवलोकनावरून असें स्पष्ट म्हणतां येतें कीं बंगाली (विशेषत:) आणि मद्रासी शास्त्रज्ञांचें संशोधन-कार्य जसें त्यांच्या प्रांतांत झालें आहे तसेंच प्रांताबाहेर जाऊन तेथील संस्थांच्या सोयींचा फायदा घेऊनहि केलेलें आहे. पण महाराष्ट्रीय शास्त्रज्ञांनीं शास्त्रीय जगाला दिलेल्या वांट्यापैकीं फार मोठा हिस्सा महाराष्ट्राबाहेर पडलेल्यांच्या कर्तबगारीमुळेंच व त्यांना तेथें मिळालेल्या सोयींमुळेंच उचलतां आलेला आहे ! याचा असा उघड अर्थ होतो कीं महाराष्ट्रीयांच्या कर्तबगारीला महाराष्ट्रांत वाव नाहीं व परस्थांनीं त्यांची पाठ थोपटल्याखेरीज त्यांना येथें कोणी विचारीत नाहीं.

मागें म्हटल्याप्रमाणें ही परिषद् सुरू करतांना प्रो. मॅकमहोन व प्रो. सायमॉन्सेन यांच्या डोळ्यासमोर इंग्लंडमधलि " ब्रिटिश असोशिएशन् फॉर दि कल्टिव्हेशन ऑफ सायन्स " ही सुप्रसिद्ध व पुरातन संस्था आदर्श म्हणून होती. आज ३७ वर्षांनंतर हिची बरीच प्रगति झाली असली तरीं मूळ आदर्शाशीं या भारतीय प्रतिकृतीची कितपत तुलना करतां येईल बरें ?

## भारतीय शास्त्रीय परिषद्

### कांहीं प्रांतवार आंकडे ( १९१४–१९५० )

| | बंगाली | मद्रासी | महाराष्ट्रीय | युरोपिअन् ख्रिश्चन इ. | इतर | एकंदर |
|---|---|---|---|---|---|---|
| मुख्य अध्यक्ष | ९ | ४ | ० | १५ | ९ | ३७ |
| विभागीय अध्यक्ष | ९३ | ६६ | २१ | १०२ | ७३ | ३५५ |
| चर्चेत भाग घेणारे | ५३० | ३३० | ११५ | २७० | ४६० | १७०५ |
| सदीप व्याख्यानें देणारे | २४ | १६ | ६ | ५५ | १९ | १२० |

# घुबडाचें पिलुं

(पद्मावर्तनी–मुक्तछंद)

––आणि पुण्याच्या नव्या पुलावर
फिरावयाला पाहिल्या प्रहरीं
जातां, बसलों आनंदानें त्या दगडांच्या कठड्यावरती
नदींत कोणी करितो स्नान
  कुणी टाकुनी बसला जाळें
  पकडायाला मासे थोडे

––मधुर धुक्यामधिं धूर मिसळतो...
-निघते गाडी मुंबईकडेऽ उत्साहाची वाजत शीट
जणूं कुणी कन्यका निघाली, घाइघाइनें कॉलेजाला–

––'देहू' 'खडकी' मनांत घोळत।
  सायकलीवर डबे निघाले
  नरम गरम आंतल्या हवेनें!

––मी बसलेलों नव्या पुलावर––
मन माझें त्या हवेंत न्हात
  उत्साहानें गाणें गात––

––तितुक्यामध्यें धडपड, खुसखुस
  ऐकूं ये पाठच्या बाजुला
वळुन पाहतां कमानीमधें–धडपडणारें तडफडणारें
  घुबडाचें पिलुं दिसलें मजला

––अतां संपला त्याचा "दिवस"
डोळे त्याचे अतां जायचे!
निराधार निर्वासित पोर––
  टकाटकां मजकडे पाहते
  भिडवित डोळ्यालागीं डोळा
  शरणार्थींचा नयनीं भाव

––कपोत जैसा शिबीपुढें त्या––
  घाबरलेले डोळे त्याचे!!

––झटकन् मी पण
  मान वळविली
अपशकुनी हें नकोच दर्शन...
दिवसच माझा वाइट जाइल...
रामप्रहर हा! रामप्रहर हा!...

––परंतु, त्या, त्या नयनांमधला
भाव निरागस करुग कोवळा
कुणासारखा तरी वाटला

––आणिक चटकन्
  आठव आला

––रुग्ण, जर्जरित मम बाळाच्या त्या नयनांचा
––करुण, अबल, मृदु त्या नयनांचा
––'कडेवरी घ्या, घ्या' म्हणणाऱ्या त्या नयनांचा...
उठलों...
उठलों, वाटत
पिलास घ्यावें कुरवाळावें
  कुशींत न्यावें
पुन्हां आणखी मान वळविली––

––पण तें गेलें होतें तेथुन
बहुधा ऐसें म्हणत मनाशीं,
'अपशकुन्याचें, या पाप्याचें, या जंतूचें
  नकोच दर्शन, नकोच दर्शन!'

––प्रा. वि. म. कुलकर्णी






श्री. शंकरराव देव

# सत्याग्रह म्हणजे निःशस्त्र प्रतिकार नव्हे

'नवभारत'च्या ऑक्टोबर १९४९च्या अंकांत आचार्य शंकरराव जावडेकर यांचा 'राष्ट्रीय लोकशाही आणि सत्याग्रह-क्रांति' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. भारताला स्वातंत्र्य मिळालें असून या देशांत लोकमतानुवर्ती राज्यपद्धति म्हणजेच लोकशाही प्रस्थापित झाली आहे. तेव्हां यापुढें सत्याग्रहाची जरूरी काय, असा प्रश्न सध्यां विचारला जात आहे. श्री. शंकररावांनीं आपल्या या लेखांत सामाजिक क्रांतीच्या संदर्भांत हा प्रश्न व त्याचें उत्तर याचें विवेचन केलें आहे. सत्याग्रह-क्रांतीची आवश्यकता एकदां मान्य केली कीं आपल्या देशांतील गेल्या २०-२५ वर्षांचा राजकीय इतिहास लक्षांत घेतां या क्रांतीच्या क्षेत्रांत समाजवादी व गांधीवादी यांची भूमिका व कार्य यांची चर्चा अपरिहार्यच आहे.

सत्य हें अनंत असल्यामुळें सत्याग्रह हें एक अखंड क्रांतिशास्त्र आहे हें श्री. शंकररावांचें विधान कोणालाहि अमान्य होण्यासारखें नाहीं. म्हणून आपल्या देशांत राष्ट्रीय सरकार स्थापन होऊन लोकशाही राज्य चालूं झालें आहे; तेव्हां सत्याग्रहाची भाषा बोलणें किंवा सत्याग्रही क्रांतीची आवश्यकता पुरस्कारिणें हें तत्त्वतःच चुकीचें आहे असें जे मानतात त्यांना सत्याग्रहाचें खरें स्वरूपच समजलें नाहीं असें म्हणणें भाग आहे.

लोकशाही राज्यांत सुद्धां नागरिकस्वातंत्र्य व हक्क यांचें रक्षण करण्यासाठीं वैयक्तिक वा सामुदायिक कायदेभंग अगर सत्याग्रह करण्याची आवश्यकता उत्पन्न होणें संभवनीयच नाहीं असें म्हणणें म्हणजे सत्ताधारी सदा शहाणपणानेंच वागतील असें मानण्यासारखेंच आहे. उलट, सत्तेनें राज्यकर्त्यांचीं डोकीं फिरतात असाच आजपर्यंतचा सार्वत्रिक अनुभव आहे. शिवाय व्यक्तीनें आपल्या मनोदेवतेला कायमचें बहुमताच्या हवालीं केलें पाहिजे असा दंडक घालणें म्हणजे स्वयंविकासाचें अखेरचें एकमेव साधन तिच्या हातून काढून घेण्यासारखेंच आहे!

## भारत कोणता मार्ग स्वीकारणार ?

परंतु श्री. शंकररावांनीं आपल्या लेखांत या विषयाचें जें विवेचन केलें आहे तें मुख्यतः सामाजिक क्रांतीच्या दृष्टीनें केलें आहे आणि तें योग्यच आहे. कारण झालेल्या राज्यक्रांतीचें सामाजिक क्रांतींत कसें व केव्हां रूपांतर करावयाचें हाच आज देशापुढें मुख्य प्रश्न आहे. ज्या कौशल्यानें व यशस्वी रीतीनें आम्ही हा प्रश्न सोडवूं, त्यावर भारताचें भवितव्य अवलंबून आहे.

इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका या देशांतील आजची लोकशाही भांडवलशाहीप्रधान लोकशाही आहे, ही गोष्ट आज सर्वमान्य झालेली आहे. अमेरिका अशा प्रकारच्या निर्भेळ लोकशाहीची आजहि कट्टर पुरस्कर्ती आहे. पण इंग्लंड, फ्रान्स-विशेषतः इंग्लंड या भांडवलदारलोकशाहीचें पार्लमेंटरी पद्धतीनें समाजवादी लोकशाहींत रूपांतर करण्याचा एक अभिनव प्रयोग करीत आहे. या मार्गाचा अवलंब केल्यामुळें इंग्लंडची या मार्गावरील प्रगति फारच मंद आहे; इतकेंच नव्हे तर इंग्लंडला या प्रयोगांत अखेर संपूर्ण यश येईल किंवा नाहीं हेंहि आग्रहपूर्वक सांगणें धोक्याचें आहे.

भारत कोणता मार्ग स्वीकारणार ? अमेरिका आमचा मार्गदर्शक होऊं शकत नाहीं हें सांगण्याची, मला वाटतें, जरूरी नाहीं. कारण बाकीच्या गोष्टी








# सत्याग्रह म्हणजे निःशस्त्र प्रतिकार नव्हे

बाजूला ठेवल्या व केवळ आमच्या स्वातंत्र्य-लढ्याच्या मागील ध्येयवाद व त्याची साधनें लक्षांत घेतली तरी सुद्धां आम्हीं अमेरिकेच्या पावलावर पाउल ठेवून चालणें अशक्य आहे हें कुणीहि मान्य करील.

इंग्लंडच्या व आमच्या संबंधांत आज क्रांतिकारक बदल झाला असला तरी इंग्लंडनें आपल्या राजकीय, आर्थिक, सामाजिक संस्था व संस्कृति मार्गे ठेवल्या आहेत. त्यांचा भारतीय जीवनावर खोल व दूरगामी परिणाम झालेला आहे व पुढेंहि किती काल तो होत राहील हें आज निश्चयानें सांगणें कठीण आहे. शांतिमय क्रांतीचा हा एक अपरिहार्य परिणाम आहे. तेव्हां इंग्लंडचा सामाजिक लोकशाही निर्माण करण्याचा मार्ग अनुसरण्याकडे आमच्या मनाचा कल होणें संभवनीय आहे, नव्हें स्वाभाविकही आहे. पण श्री. शंकरराव म्हणतात त्याप्रमाणें इंग्लंडची गति फार मंद आहे; शिवाय इंग्लंड साम्राज्यशाही राष्ट्र होतें व त्यानें आपल्या या प्रवासाचें जेव्हां प्रस्थान ठेवलें तेव्हांचा काल व मुहूर्त निराळा होता. आम्हांला पहिली गोष्ट वांछनीय नाहीं व दुसरीची आतां शक्यता दिसत नाहीं.

रशियाचें उदाहरणहि आम्हांला निरुपयोगी आहे. कारण धनसत्तेचा उच्छेद करून भांडवलदार-लोकशाहीचें समाजवादी लोकशाहींत रूपांतर करतांना लोकशाही व व्यक्तिस्वातंत्र्यच नष्ट होऊन तिच्या जागीं हुकुमशाही येणार नाहीं अशी दक्षता घ्यावी लागते. जर अत्याचारी क्रांतीचा मार्ग अनुसरला तर बराच काळ देशांत एकपक्षीय अनियंत्रित राज्यसत्ता स्थापन होते व नंतर पुनः लोकशाही निर्माण करणें कठीण जातें असा अनुभव रशियांत आला आहे. आम्ही लोकशाहीचे कट्टर पुरस्कर्ते आहोंत तेव्हां आम्हांला रशियाचा रस्ता बंद आहे.

अत्याचारी क्रांति लोकशाहीचा नाश करते तर केवळ पार्लमेंटरी पद्धतींत प्रगतीची गति अति मंद असते; म्हणून हे दोन्ही मार्ग आम्हाला परवडणारे नाहींत. आम्हांला राष्ट्रीय लोकशाहीला मारक न होणारा पण क्रांतिमार्गाप्रमाणें जलद प्रगति करणारा सत्याग्रही किंवा अनत्याचारी क्रांतीचा मार्ग स्वीकारून आपल्या देशांत समाजवादी क्रांति करून दाखविण्याचें धोरण स्वीकारणें अवश्य आहे, या श्री. शंकररावांच्या विचारसरणीशीं मी पूर्ण सहमत आहे. ऑल इंडिया काँ. कामिटीतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'इकॉनॉमिक रिव्ह्यू' मधील 'सर्वोदयाच्या मार्गावर' या माझ्या लेखांत (१ नोव्हेंबर) मी या विषयासंबंधीं माझें मत पुढीलप्रमाणें व्यक्त केलें आहे: ' सर्वोदयाचें साध्य प्राप्त करावयाचें तर सार्वत्रिक मतदानपद्धति, भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य व शांततेच्या आणि लोकशाहीच्या मार्गानें काम करणारे राजकीय पक्ष इत्यादी लोकशाहीप्रधान संस्थांना वाढण्याला पूर्ण वाव असला पाहिजे. अशा प्रकारच्या लोकशाही संस्था आपलें ध्येय प्राप्त करण्याला बव्हंशानें आपल्याला मदत करतील हें खरें; तथापि प्रगतीची गति वाढविण्यासाठीं संप वा सत्याग्रह यासारख्या क्रांतिकारक साधनांनाहि मान्यता मिळाली पाहिजे.''

## मतपरिवर्तन हा लोकशाहीचा आत्मा

श्री. शंकररावांना येथें जी सत्याग्रही अगर अनत्याचारी क्रांति अभिप्रेत आहे, ती गांधीजींनीं पुरस्कृत केलेली आहे हें अगदीं उघड आहे. कारण ते लिहितात : '' म. गांधींनीं जें अनत्याचारी क्रांतीचें तत्त्व आपणास दाखवून दिलें आहे, त्याच तत्त्वाचा अवलंब करून आपणांस हिंदुस्थानांत समाजवादी लोकशाही स्थापन करतां येईल हें पंतप्रधान पं. नेहरू यांनीं आपल्या आत्मचरित्रांत मांडिलें आहे. '' समाजवादी लोकशाहीची स्थापना करतांना आजच्या भांडवलदारवर्गाच्या मालमत्तेच्या हक्कांना धक्का लावावा लागेल हें उघड आहे. पण असे समाजवादी कायदे जर लोकशाहीपद्धतीनें बहुमतानुसार करण्यांत आले तर ती धनिकांवर सक्ती होते व म्हणून तसें करणें अनैतिक आहे किंवा असे कायदे करणेंच मुळांत अनैतिक आहे असें कोणी म्हणूं शकणार नाहीं. कारण बहुमतानें केलेला कायदा अल्पमतवाल्यांनीं पाळणें हें लोकशाहीचें एक मूलभूत तत्त्व आहे. श्री. शंकररावांच्या भाषेंत बोलावयाचें तर समाजवाद्यांची ही विचारसरणी








वा मत गांधीवाद्यांना कशी अमान्य करतां येईल? आणि ती त्यांनीं अमान्य केल्याचें कोणाच्या ऐकण्यांतहि नाहीं.

अर्थात् लोकशाहीचा आत्मा मतपरिवर्तन हाच आहे. लोकशाही पद्धतीचा अवलंब करणाऱ्यावर बहुसंख्याक जनतेचें मत आपल्या मताप्रमाणें करून घेण्याची जबाबदारी येते. सध्यांच्या पार्लमेंटरी पद्धतींत हें हृदयपरिवर्तन करण्याचें एकमेव साधन बुद्धिबलावर आधारलेला युक्तिवाद हेंच आहे. पण हें साधन अनुभवानें अल्पप्रभावी सिद्ध झालें असल्यामुळें त्याला सत्याग्रहाची जोड देण्याची आवश्यकता पटवून देण्याचा श्री. शंकरराव प्रयत्न करीत आहेत.

सत्याग्रहामध्यें सत्याच्या आग्रहासाठीं जे क्लेश व जो त्याग केला जातो त्यामुळें हृदयपरिवर्तन शीघ्र होण्याची शक्यता गृहीत धरलेली आहे. अर्थात् व्यक्तीच्या वा गटाच्या या हृदयपरिवर्तनाला सामाजिक व्यवहाराच्या रूपानें स्थायी स्वरूप द्यावयाचें तर लोकशाही पद्धतीनें केलेल्या कायद्याची मदत घेतलीच पाहिजे. म्हणून सत्याग्रही हा लोकशाहीवादी अवश्य असतो.

## गांधीजींनीं अशी भिंत उभारली असती का?

श्री. शंकररावांच्या सल्ल्याप्रमाणें सामाजिक क्रांति घडवून आणण्यासाठीं भारतीय समाजवादी गांधींच्या सत्याग्रह-क्रांतिशास्त्राचा उपयोग करण्याचा निश्चय करतील तर त्यांना ज्या लोकांचें हृदयपरिवर्तन करावयाचें आहे त्यांच्यामध्यें, ज्या वर्गाला आपल्या मालकी हक्काला मुकावें लागणार आहे, त्याचाहि अंतर्भाव करावा लागेल. कारण गांधींच्या तत्त्वज्ञानांत हृदयपरिवर्तनाचा विषय होण्याला कायमची अपात्र अशी व्यक्ति नाहीं. शिवाय मतपरिवर्तन घडवून आणण्याची आवश्यकता कोणाच्या बाबतींत अधिक असेल तर ती खास या वर्गाच्या बाबतींतच आहे. दुसरें, हा क्रांतिकारक सामाजिक बदल शक्य तितक्या लवकर दोन्हीहि पक्षांकडून, हिंसेचा अवलंब न करतां, घडून यावयाचा तर या वर्गाच्या मतपरिवर्तनाला अधिक महत्त्व देणें क्रमप्राप्तच आहे. पण श्री. शंकरराव या विचारसरणीशीं संपूर्ण सहमत आहेत असें वाटत नाहीं. कारण ते आपल्या लेखांत लिहितात : "आपलें हें मत समाजाला पटवून देण्यास लोकशाही समाजवादाचे पुरस्कर्ते तयार आहेत. जोंपर्यंत आपलें हें मत बहुसंख्य मतदारांना पटलेलें नाहीं, तोंपर्यंत समाजावर तें सक्तीनें लादण्यांत येऊं नये ही लोकशाहीची नीति त्यांना मान्य आहे. पण ज्या वर्गाच्या स्वार्थावर समाजहितासाठीं नियंत्रण घालावें लागणार आहे, त्या वर्गाचें हृदयपरिवर्तन झालें तरच असे समाजवादी कायदे करावेत आणि तोंपर्यंत समाजांत पेटणारा वर्गकलह तसाच चालू देऊन समाजहिताची होळी होऊं द्यावी हें मत समाजवाद्यांना समंजसपणाचें वाटत नाहीं. सर्वच संग्रह हें पाप आहे अथवा चोरी आहे असें म्हणणाऱ्या गांधीवाद्यांना तरी मालकी हक्कानें प्राप्त होणाऱ्या अकष्टार्जित उत्पन्नाचें म्हणजे व्याज, खंड व नफा यांचें नैतिक समर्थन कसें करतां येईल? अर्थात् त्यांना सुद्धां लोकशाही राजनीतीची सामान्य मर्यादा ओलांडून समाजवादी कायदे करतांना स्वार्थी धनिक वर्गाची संमति मिळविण्याची शर्त समाजवाद्यांवर लादतां येणार नाहीं. समाजवाद्यांनीं आपलीं तत्त्वें कष्टजीवी सामान्य जनतेला पटवून दिलीं म्हणजे पुरे आहे असें समजून गांधीवाद्यांनीं आपला राजकीय व्यवहार केला पाहिजे."

अर्थात् लोकशाही राजनीतीची सामान्य मर्यादा ओलांडून समाजांत पेटणारा वर्गकलह तसाच चालूं देऊन समाजहिताची होळी होऊं देण्याचें पाप गांधीवादी करणार नाहींत अशी माझी खात्री आहे. कष्टजीवी सामान्य जनतेचें हित करण्याच्या कामांत समाजवाद्यांवर भलत्या अटी लादून सामाजिक अन्याय दृढमूल करण्याचा अव्यवहारीपणा गांधीवाद्यांनीं करूं नये असा श्री. शंकररावांप्रमाणें मीहि त्यांना प्रेमाचा सल्ला देईन. मात्र असें करीत असतांना "तुमचा सत्याग्रह हा गांधींचा सत्याग्रह नाहीं" असें समाजवाद्यांनाहि मला स्पष्ट सांगावें लागेल. कारण गांधीजींनीं समाजांतलि धनिक व कष्टजीवी वर्गांत अशी अभंग भिंत उभी केली नसती. किंवा हृदयपरिवर्तनाच्या कामांत, श्री. शंकरराव करतात








त्याप्रमाणें, समाजवादी व गांधीवादी अशी विभागणी त्यांनीं केली नसती.

## साध्यसाधनांइतकेंच साधनेलाही महत्त्व

श्री. शंकरराव समन्वयवादी म्हणून महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. मार्क्सवाद व गांधीवाद यांच्या समन्वयांतून निघालेला सत्याग्रही समाजवाद ही राजकीय तत्त्वज्ञानांत श्री. शंकररावांनीं घातलेली खास भर आहे. मार्क्सचा समाजवाद गांधीवाद्यांनीं मान्य केला पाहिजे व खरा समाजवाद स्थापन करावयाचा तर समाजवाद्यांनीं गांधीजींचा सत्याग्रह मान्य केला पाहिजे, असें त्यांचें प्रतिपादन आहे. असें करण्यांत गांधीवाद्यांना कांहींच अडचण भासण्याचें कारण नाहीं. १९४६ मध्यें श्री. शंकररावांनीं 'लोकशक्ती'चें संपादकत्व सोडलें व 'लोकशक्तीचा राजीनामा' हा लेख लिहिला. या लेखाचा परामर्श घेतांना माझ्या लेखांत मी म्हटलें होतें कीं "आम्हीं स्वतःला गांधीवादी व समाजवादी मानीत असलों व मानले जात असलों तरी, जर आम्हीं दोघे अखेरपर्यंत सत्यनिष्ठ राहिलों व आमची सत्याग्रहनिष्ठा कायम राहिली तर, आम्ही दोघें एकाच मुक्कामाला जाऊन पोहोंचूं अशी माझी पुरी खात्री होती व आहे." कारण गांधीतत्त्वज्ञानाप्रमाणें साध्यसाधनांचा अभेद्य संबंध आहे. श्री. शंकरराव दुसऱ्या एका ठिकाणीं लिहितात : "सत्यासाठीं म्हणजेच वास्तविक सर्वोदय ज्यांत आहे त्या तत्त्वाच्या प्रचारासाठीं व संस्थापनेसाठीं परंपरागत सामाजिक कर्तव्यें, रूढ बंधनें आणि प्रस्थापित राजकीय संस्था अथवा कायदे यांच्या विरुद्ध उभे राहून आपल्या स्वतःच्या अंतरात्म्याला साक्षी ठेवून त्याच्या आदेशानुसार वागावें लागतें." पण असा केवळ सत्याचा आग्रह धरणारा तो गांधीतत्त्वाप्रमाणें सत्याग्रही झाला, असें नाहीं. व श्री. शंकररावांनाहि ही गोष्ट मान्य आहे. ते लिहितात : "केवळ सत्याचा आग्रह येवढ्या एकच वृत्तीवर भर दिला तर म. गांधी यांच्याप्रमाणें कार्ल मार्क्स व लेनिन हेहि सत्याग्रही होते असें म्हणावें लागेल. कारण तेहि सत्यासाठीं, सर्वहितासाठीं व सर्वोदयासाठींच लढले असें म्हणतां येईल. पण सत्याग्रही वृत्ति किंवा सर्वोदयनिष्ठा यांत सत्याच्या 'साध्या'-इतकाच अहिंसेच्या साधनावरहि भर द्यावा लागतो. सत्याग्रही हा क्रांतिकारक असतो. तसाच तो ही क्रांति अहिंसेनें करूं इच्छितो. म्हणून सत्याग्रह व सर्वोदयवाद यांत क्रांतिवृत्ति आणि अहिंसावृत्ति या दोहोंचाहि अंतर्भाव होतो". या शब्दांचा अर्थ अगदीं स्पष्ट आहे. म. गांधींच्या जीवनाचा हाच खरा संदेश आहे. सत्यासाठीं जीवन अर्पण करणारे महापुरुष म. गांधींच्यापूर्वी अनेक होऊन गेले. पण सत्यदर्शन अहिंसेनेंच होऊं शकतें असें म्हणणारे व जीवनाच्या सर्व क्षेत्रांत तिचा आविष्कार करणारे म. गांधी हे जगांतील पाहिले थोर पुरुष होत. तेव्हां अहिंसा हा गांधींच्या सत्याग्रहाचा आत्मा आहे. समाजवादी काय किंवा गांधीवादी काय जर सत्याग्रही होऊं इच्छीत असतील तर त्यांनीं या अहिंसेचा अर्थ बुद्धीनें जाणला पाहिजे व शरीरानें आचरला पाहिजे. वृत्तीचा आविष्कार व वृद्धि कर्मांतूनच होते. गांधीतत्त्वज्ञानांत जितकें महत्त्व साध्य व साधन यांना आहे, तितकेंच तें साधनेलाहि पण आहे. गांधीजी म्हणतात : "सत्याचें संपूर्ण दर्शन घ्यावयाचें तर सर्व भूतमात्रांवर आत्मवत् प्रेम केलें पाहिजे." गांधीजींच्या मतें या प्रेमाची वा अहिंसेची तयारी व तिचा आविष्कार म्हणजेच रचनात्मक कार्यक्रमांच्या द्वारा लोकसेवा.

## सत्याग्रह कीं निःशस्त्र प्रतिकार?

वर श्री. शंकररावांच्या लेखांतील जो दीर्घ उतारा दिला आहे त्यांतील वृत्ति व विचारसरणी या सत्याग्रही वृत्तीशीं व विचारसरणीशीं सुसंगत नाहीं. शिवाय सत्याग्रहाची तयारी म्हणून रचनात्मक कार्यक्रमावर म्हणजेच साधनेवर शंकररावांनीं कधींच भर दिलेला नाहीं. या वृत्तीच्या व साधनेच्या अभावीं आम्ही सत्याग्रहाच्या नांवाखालीं निःशस्त्रप्रतिकारच करीत असतों. आणि म्हणूनच आमच्या सत्याग्रहाला विपरीत फळें येतात. दक्षिण आफ्रिकेंत जेव्हां गांधीजींनीं आपली चळवळ सुरूं केली तेव्हां प्रथम प्रथम लोक





अनुक्रमणिका

तिला 'निःशस्त्रप्रतिकार' या नांवानेंच संबोधीत. पण आपली चळवळ दुर्बलांनीं नाइलाजानें उचललेलें शस्त्र नाहीं, त्यांत द्वेषाला स्थान नाहीं व त्याचें अंतिम पर्यवसान अत्याचार नाहीं, हें लोकांच्या नीट ध्यानांत यावें म्हणून गांधीजींनीं पूर्ण विचारांतीं तिला 'सत्याग्रह' असें नांव दिलें. 'स्वातंत्र्याची अखेरची मोहिम' या आपल्या जानेवारी १९४६ मध्यें लिहिलेल्या लेखांत श्री. शंकररावांनीं राष्ट्रीय सभेचा स्वयं-विकासी क्रांतिवाद—ज्यांत १९४२ सालच्या लढ्यांतील 'नवतंत्रा'चाहि अंतर्भाव होतो—व महात्मा गांधींचा अहिंसक क्रांतिवाद यांत फरक केला आहे. मला वाटतें, श्री. शंकररावांची आजहि तीच भूमिका आहे. ते सत्याग्रह हा शब्द वापरतात व त्याला अहिंसेची आवश्यकता आहे असें प्रतिपादन करतात; पण व्यवहारांत हा स्वयंविकासी क्रांतिवाद वा निःशस्त्र प्रतिकारच त्यांना अभिप्रेत असतो. १९४६ सालीं 'लोकशक्तीचा राजीनामा' या याच्या लेखाला उत्तर देतांना मी त्यांचें या गोष्टीकडे लक्ष वेधलें होतें व आजहि पुनः वेधूं इच्छितों.

अर्थात् माझ्या अगर आमच्या सत्याग्रहाचा अर्थ गांधीजींच्या सत्याग्रहाच्या अर्थाशीं जुळलाच पाहिजे असा आग्रह तुम्हीं कां धरावा, असा प्रश्न येथें श्री.शंकरराव अथवा समाजवादी करूं शकतील. शब्दांचा व त्यांच्या अर्थाचा कोणी मक्ता घेऊं शकत नाहीं व कोणी देऊं शकत नाहीं; ती सर्वांची सारखी संपत्ति आहे. म्हणून गांधीजी ज्या अर्थानें सत्याग्रह या शब्दाचा उपयोग करीत होते त्याहून निराळ्या अर्थानें तो करण्याचा आम्हांला हक्क आहे व तो आमचा हक्क कोणी हिरावून घेऊं शकत नाहीं असाहि ते दावा करूं शकतील. शब्दाचे अर्थ कालानें व वापरानें बदलतात; एवढेंच नव्हे तर पुष्कळ वेळां त्यांत सहेतुक अधिक वा उणे अर्थ भरले सुद्धां जातात, हें सर्व खरें. पण गांधीजींची शिकवणूक अद्याप इतकी ताजी आहे व त्यांच्या 'अहिंसा', 'सत्याग्रह' या शब्दमंत्रांचा प्रभाव जन-मनावर इतका विलक्षण आहे कीं हे शब्द कोणी प्रामाणिकपणें निराळ्या अर्थानें वापरले, तरी लोक त्यांचा अर्थ गांधीजींच्या शब्दकोशानें व व्याकरणानें लावल्यावांचून राहणार नाहींत. "सत्यनिष्ठ, अहिंसक आणि अंतःशुद्ध असे जे समाजवादी असतील तेच हिंदुस्थानांत व जगांत समाजवादी समाज निर्माण करूं शकतील" असें जेव्हां गांधीजी म्हणतात तेव्हां कोणत्या अर्थानें हें शब्द त्यांनीं वापरले आहेत याबद्दल तिळमात्र संशय उरत नाहीं. व हेच त्यांचे शब्द डोळ्यांपुढें ठेवून जेव्हां श्री. शंकरराव लिहितात कीं "गांधीजींच्या अशा लिखाणाकडे पाहिल्यास ते सत्याग्रही समाजवादी होते. आणि राजकीय स्वातंत्र्याचा प्राप्तीनंतर सत्याग्रहाचें पुढील कार्य हिंदुस्थानांत व जगांत समाजवादाची स्थापना करणें हेंच असावें, असें त्यांनीं प्रतिपादिलें असतें असें माझें स्वतःचें मत आहे", तेव्हां अहिंसा, सत्याग्रह या शब्दांचा माझा अर्थ गांधीजींच्या अर्थाहून निराळा आहे असें म्हणण्याचा जर श्री. शंकरराव आग्रह धरतील तर ते गांधीजी व त्यांचें तत्त्वज्ञान याला हानि पोहोंचवतील; इतकेंच नव्हे तर स्वतःच्या कार्यालाहि कमीपणा आणतील असें मी नम्रपणें नमूद करूं इच्छितों.

श्री. शंकररावांच्या लिखाणाचा परिणाम जनतेंत असा एक भ्रम उत्पन्न करण्याकडे होत आहे कीं गांधीजींचा वारसा आज भारतीय समाजवाद्यांच्याकडे आला असून तेच त्यांचें कार्य पुढें चालवीत आहेत, व कॉंग्रेस व गांधीवादी यांनीं महात्मा गांधींची शिकवणूक व कार्य यांचा त्याग केला आहे. उदा०, श्री. शंकररावांच्या याच लेखांतील पुढील मजकूर घ्या. ते म्हणतात : "समाजाच्या मताचें परिवर्तन करीपर्यंत सत्याग्रह व अनत्याचारी असहकार या मार्गाचें अवलंबन करूं आणि त्यानंतर कायदेशीर सक्ती करून आम्ही लोकशाही समाजवादाची स्थापना करूं व त्याला बेकायदा अडथळा करणारांना राजदंडानें व न्याय्य मार्गानें शासन करूं, असें म्हणणाऱ्या समाजवाद्यांना गांधीवादी व्यवहारदृष्टीनें विरोध करूं शकत नाहींत", या लिखाणानें श्री. शंकरराव असें सूचित करीत आहेत कीं समाजवादी आज कॉंग्रेससरकाराविरुद्ध मधून मधून जी प्रत्यक्ष








प्रतिकार करीत आहेत तो सत्याग्रहच होय व म्हणून जनतेनें व खास गांधीवाद्यांनीं त्यांना आपला पाठिंबा दिला पाहिजे. समाजवाद्यांच्या तथाकथित सत्याग्रहांत 'सत्यनिष्ठा, अहिंसा आणि अंतःशुद्धि' किती आहे हा विचारणीय प्रश्न आहे. त्याचप्रमाणें हे गुण अंगीं आणण्यासाठीं करावी लागणारी साधना समाजवाद्यांनीं केव्हां केली असा प्रश्न कोणीं केला तर त्याच्यावर समाजवाद्यांचा अवमान करण्याचा वा ते जें कार्य करीत आहेत त्याचें मूल्यमापन करण्यांत कृपणता दाखविण्याचा आरोप करणें योग्य होणार नाहीं.

## प्रेम हें सामान्य जनांनाही आकलनीय

गांधीजींच्या मताप्रमाणें ईश्वरावर श्रद्धा, सत्यावर निष्ठा व सर्वांवर प्रेम हीं सत्याग्रहाचीं तीन मुख्य लक्षणें होत. ईश्वराविषयीं ज्या नाना गूढ कल्पना प्रचलित आहेत त्या लक्षांत घेतल्यावर त्याच्या अस्तित्वाला स्वानुभवजन्य बौद्धिक मान्यता देणें सामान्य माणसाच्या शक्तीच्या बाहेरची गोष्ट आहे. 'तो' आहे असें सत्पुरुष म्हणतात तेव्हां 'तो' असावा असें मी मानतों, एवढेंच फार तर तो म्हणूं शकेल. सत्याचें मुद्दां असेंच आहे. सत्य म्हणजे काय हें सदासर्वदा निश्चित सांगणें वा समजणें हेंहि सामान्य माणसाच्या बाबतींत तितकेंच दुर्घट आहे. ज्याला आपण वाचिक सत्य म्हणतों तें काय आहे हें त्याला समजूं शकतें. जें आपल्या मनांत असेल तेंच बोलावें, त्याच्या उलट बोलूं नये असें कोणाहि सर्वसाधारण माणसाला सांगितलें तर तें त्याला समजेल. परंतु एवढ्यानें सत्याचें सर्व स्वरूप संपत नाहीं. तें फार सूक्ष्म आहे व त्यामुळें सामान्य माणसाची इच्छा असूनहि त्याला संपूर्ण सत्याचें आकलन होणें व त्याप्रमाणें आचार घडणें तितकें सोपें नाहीं. उदा०, मनाला वाटतें त्याप्रमाणें बोलावें हें ठीक आहे; परंतु मनाला जें वाटतें तें योग्य वा सत्य आहे का, असा प्रश्न उत्पन्न होतो व त्याचें उत्तर समर्पक सामान्य बुद्धीला सुचेलच असें नाहीं व जें सुचेल तें बरोबर असेलच अशीहि खात्री देता येणार नाहीं. मात्र प्रेमाचें तसें नाहीं. ईश्वराचें गूढ स्वरूप, सत्याचा सूक्ष्म अर्थ सामान्य माणसाला आकलन होणार नाहीं. पण प्रेम त्याच्या नित्यानुभवाची गोष्ट आहे. प्रेम न करणारा माणूस विरळा; बहुतेक माणसांना कौटुंबिक जीवनांत प्रेमाचे पाठ व सत्याग्रहाचे धडे मिळतच असतात. ज्याच्यावर आपण प्रेम करतों त्याचें आपण भलें करूं इच्छितों; त्याला शारीरिक वा मानसिक दुःख देऊं इच्छित नाहीं. त्याच्या हातून कांहीं वाईट कृत्य होत असेल तर त्यापासून त्याला युक्तिवादानें परावृत्त करूं इच्छितों व तेवढ्यानें काम भागलें नाहीं तर ज्यांत क्लेश व त्याग भरलेला आहे अशा मार्गांनीं त्याला सन्मार्गावर आणण्याचा प्रयत्न करतों व बहुतेक वेळीं त्यांत यशहि येतें. जोंपर्यंत कुटुंबांतील व्यक्ती परस्परांशीं या धर्मानें वागतात, तोंपर्यंतच तें कुटुंब टिकतें व त्यांतील माणसें एकमेकांच्या सुखासाठीं व वाढीसाठीं परस्परांना मदत करितात. या सर्व गोष्टी समजण्याला व त्या आचरणांत आणण्याला मोठी विद्वत्ता लागत नाहीं. सामान्य माणसांचा हा सहज धर्मच बनतो. थोडक्यांत बोलावयाचें तर स्वतःचा संसार ही सर्वोदयाचें शिक्षण घेण्याची उत्कृष्ट 'वर्धा–शाळा'च होय.

## शुद्ध समाजवाद म्हणजे सर्वोदयच

हा कुटुंबाचा न्याय समाजाला लागू केला तर ज्या समाजांत सर्वांच्या हितासाठीं प्रत्येक नागरिक झटतो तो सर्वोदयी समाज होय. ज्याला श्री. शंकरराव शुद्ध समाजवाद म्हणतात तो सर्वोदयच होय. अशा सर्वोदयाची स्थापना ज्या सत्याग्रहानें होईल असें श्री. शंकरराव प्रतिपादितात तो सत्याग्रह हा निःशस्त्र प्रतिकार असूं शकत नाहीं, तर अहिंसात्मक सत्याग्रहच असूं शकतो. म्हणून श्री. शंकरराव मार्क्सवाद व गांधीवाद यांच्या समन्वयाची भाषा बोलतात व सत्याग्रही समाजवाद असा शब्दप्रयोग करतात, तेव्हां ते गांधीवादी व समाजवादी असे दोन निरनिराळे वर्ग कल्पून त्यांच्या सत्याग्रहांत भेद कां करतात हेंच मला समजत नाहीं. असा भेद ते करतात; म्हणूनच त्यांना आतांपर्यंत या दोघांना एकत्रित आणण्यांत यश









अनुक्रमणिका

मिळालें नाहीं असें मला वाटतें. कष्टजीवी लोकांचें मतपरिवर्तन करणें एवढाच आपल्या सत्याग्रहाचा हेतु समाजवाद्यांनीं मानावा असा श्री. शंकरराव समाजवाद्यांना सल्ला कां देतात? यामुळें गांधींच्या सत्याग्रहामध्यें गौणत्व येतें व सत्याग्रहींमधील सात्त्विक गुण वाढविणें हें जें सत्याग्रहाचें महत्त्वाचें अंग त्यापासून समाजवादी दूर राहतात. अन्यायनिवारण व न्यायप्रस्थापना हा सत्याग्रहाचा उद्देश आहे हें खरें; परंतु हा सत्याग्रह अहिंसात्मक असेल तर त्यानें वरील हेतु साध्य होईलच. पण शिवाय त्यामुळें प्रतिपक्षाचाहि हृदयपालट होऊन त्याचाहि गुणप्रकर्ष होईल. श्री. शंकरराव ही श्रद्धा व तिची साधना यांचें अनुशासन समाजवादी मित्रांना करतील तर, त्यांच्यांत व गांधीवादी लोकांत कांहींहि अंतर न रहातां दोघांचेंहि ध्येय एकच म्हणजे सर्वोदय बनेल.

---

## श्रद्धामय धर्मापेक्षां नवीन बुद्धिवाद हवा

''**अभिरुची**'च्या १९४९ च्या **दिवाळी अंकांत** श्री. **दिनेश द. माहुलकर** यांनीं ' धार्मिक शिक्षण कीं नवा बुद्धिवाद ? ' हा लेख लिहिला असून हिंदुस्थानांत धार्मिक शिक्षणाऐवजीं नव्या बुद्धिवादाचें शिक्षण द्यावें, याबद्दल मौलिक विचार मांडले आहेत : ' मानवी मनाला श्रद्धेच्या डबक्यांत सांचवून ठेवणाऱ्या धर्मानेंच आपला नाश करून घेतला आहे. बाह्य सृष्टीवर माणूस आपल्या बुद्धीनें जय मिळवूं शकला, पण श्रद्धेच्या सासुरवासांत पडलेल्या आपल्या मनाला बदलण्यास तो दचकला......जीवन सर्वत्र इतकें सोपें, निश्चित नि निर्भय झालें आहे कीं भीति, चिंता, आश्चर्य या भावना आतां थरारून जाग्या होत नाहींत व त्यामुळें बहुतेक लोक निधार्मिक ( amoral ) जीवन जगतांना आढळतात.' परंतु ' विज्ञानाच्या नव्या नव्या शोधांनीं मानवी मनाला आश्चर्याचे, भीतीचे धक्के बसताहेत. यांतूनच झाला तर नव्या धर्माचा जन्म होईल. या नव्या धर्माचें बुद्धीशीं वांकडें असणार नाहीं. उलट, बाह्य प्रकृतीवर जसा बुद्धीनेंच मानवाला जय मिळविण्यास शिकविलें तसा त्याच्या अंतःप्रवृत्तिवर जय मिळविण्यास बुद्धीच पुढें येईल. बुद्धीचें हें दुहेरी काम जेव्हां सिद्धीस जाईल तेव्हांच मानवतेचें खरें वैभव प्रगट होईल '..."शास्त्रज्ञांना मनाचा व पदार्थाचा संबंध मान्य करावा लागला असून या विश्वांत जड असें कांहीं राहिलें नाहीं. ' जडत्व ही कल्पना आहे ' हा जसा नवीन बुद्धिवादाला शोध लागला त्याबरोबरच ईश्वर, आत्मा इत्यादि सर्व नामें आहेत, कल्पना आहेत, याचाही शोध लागला आहे. जडाचें जडत्व जाऊन अजडाला जडत्व आलेलें नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'नामीकरणाचा हेत्वाभास' हा नव्या बुद्धिवादाचा खरा शोध आहे... धर्मानें निराकार ईश्वराला साकार मूर्ति बनविलें, चेतनात्म्याला अचेतन बनविलें. उलट शास्त्रानें जडाला गतिमान् बनविलें, आकाराचें निराकारत्व सिद्ध केलें...धर्म हा शब्दांच्या गुलामगिरींत इतका सांपडला आहे कीं तींतून त्याची सुटका होईल कीं नाहीं याबद्दल शंका वाटते. "





अनुक्रमणिका

प्रा. शंकर पुरुषोत्तम आघारकर

# भारतांतील शास्त्रीय संशोधनाची संघटना

प्राचीन काळीं हिंदु लोक निरनिराळ्या शास्त्रांच्या संशोधनांत प्रमुख असल्याचें व त्यांनीं गणित, ज्योतिष, कृषि, वैद्यक, स्थापत्य, धर्म, तत्त्वज्ञान, कायदा, राज्यकारभार इत्यादी विषयांत अनेक मौलिक व उपयुक्त शोध लाविल्याचें इतिहासावरून आढळून येतें. परंतु त्यानंतरच्या काळांत मात्र म्हणजे जवळ जवळ एक हजार वर्षें तरी, हिंदु लोकांनीं फारसें संशोधन केलेलें आढळत नाहीं. किंबहुना, या काळांत देशावर असलेल्या परकीय सत्तेमुळें किंवा अन्य कांहीं कारणांमुळें असो, जुन्या ग्रंथांत सर्व कांहीं आहे, आपल्यास फार तर जुन्या ग्रंथांवर टीकाभाष्यें लिहावयाचीं, अशी "बाबावाक्यं प्रमाणम्"ची वृत्ति समाजांत प्रचलित झाली. विद्या केवळ वरिष्ठ वर्गाच्या हातीं व तो सदा पारमार्थिक व परलोकाच्या चिंतेंत मग्न, व्यवहाराशीं उदरंभरणाशिवाय फारसा संबंध नाहीं! असें घडल्यानेंही समाजांतील विचारशक्ति व संशोधकबुद्धि सुप्त राहिली असेल. तें कसेंही असलें तरी या काळांत संशोधन फारसें झाल्याचें उपलब्ध ग्रंथांवरून आढळत नाहीं. इंग्रजांनीं येथील राज्यांचा पराभव करून आपलें राज्य स्थापिलें याचें एक कारण त्यांची शास्त्रीय विषयांतील निपुणता हें होतें.

इंग्रजांचा अंमल सुरू झाल्यावर, त्यांनीं येथील परिस्थितीची सर्व तऱ्हांनीं पाहणी करण्याचें कार्य सुरू केलें व त्याकरितां निरनिराळीं सरकारी खातीं स्थापिलीं. या पाहणीचा उपयोग आपलें राज्य दृढ करण्याकडे त्यांनीं केला. अशा रीतीनें परकीयांनीं आधुनिक पद्धतीचें संशोधन सुरू केलें. हें संशोधन इतिहास, भाषा, संस्कृति, वाङ्मय, वनस्पति, प्राणी, भूरचना, खनिज, हवामान, नौकानयन, भूगोल, जमीनमोजणी, व्यापार, उद्योगधंदे इत्यादी मानवी जीवनास आवश्यक अशा सर्व विषयांत झालें. हें संशोधन करणारे अधिकारी प्रायः इंग्रजच असत. त्यांच्या हाताखालीं येथील "नेटिव्ह लोक" ही माहिती गोळा करण्याकरितां नेमिले जात. परंतु या जमविलेल्या माहितीचा रिपोर्ट लिहावयाचा तो इंग्रजांनीं, अशी व्यवस्था असे. कांहीं खात्यांतून (उदा०, मोजणी व पहाणी (सर्व्हे) ह्या खात्यांत) नेटिव्ह लोकांना यंत्रें, उपकरणें वापरण्याचें ज्ञान करून देऊं नये असे निर्बंध होते. असें असूनहि या खात्यांतील कांहीं हिंदी लोक त्या त्या शास्त्रांत निपुण झाले. अशा रीतीनें आधुनिक भारतीय शास्त्रीय संशोधनाचा पाया घातला गेला.

## सरकारचीं शास्त्रीय संशोधनाचीं खातीं

(१) 'सर्व्हे ऑफ इंडिआ' (हिंदुस्थानाची पाहणी करणारें खातें): या खात्याचें काम निमलष्करी स्वरूपाचें असून, त्यांत पूर्वी सहसा हिंदी लोकांना शिरकाव नसे; झालाच तर ॲंग्लो-इंडियन्स, मुसलमान व पहाडी लोकांचा होत असे. या खात्याचें काम देशांतील व आजूबाजूच्या (विशेषतः सरहद्दीनजीकच्या) प्रदेशांची पाहणी करून लष्करी हालचालींना उपयुक्त असे लहानमोठे नकाशे तयार करण्याचें आहे. या खात्यांतील लोक निपुण असे असून त्यांनीं तयार केलेले नकाशे जगांतील उत्कृष्ट नकाशे, असें समजलें जातें. हे नकाशे छापण्याकरितां कलकत्ता येथें सर्व आधुनिक सोयींनी युक्त असा एक मोठा छापखानाही आहे.

हिंदुस्थानसरकार संशोधनखात्यांवर खर्च करीत असलेल्या रकमेपैकीं सुमारें ⅓ रक्कम या खात्यावर खर्च होते. एडनपासून सिंगापूरपर्यंत- बंदरांत येणाऱ्या भरती—ओहोटीच्या वेळा देणें व त्यांची गणितानें उंची ठरविणें ( Tide-tables ) हें नौकानयनास अत्यावश्यक कामही या खात्याकडून केलें जातें.

( २ ) 'जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया' ( हिंदुस्थानाच्या भूशास्त्रीय पाहणीचें खातें ): या खात्याचें काम देशांतील निरनिराळ्या भागांची भू-रचना तपासणें व त्या ठिकाणीं उपलब्ध होणाऱ्या खानिज पदार्थांची माहिती मिळविणें हें होय. या खात्यांतील अधिकारी सुद्धां गेल्या पंचवीस वर्षांपर्यंत बहुतेक सर्व इंग्रज होते. या खात्याचाही लौकिक फार मोठा आहे.

या दोन खात्यांशिवाय,

( ३ ) 'बोटॅनिकल सर्व्हे ऑफ इंडिया' ( हिंदुस्थानांतील वनस्पतींच्या पाहणीचें खातें ) ( ४ ) 'झूऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया' ( हिंदुस्थानांतील प्राण्यांच्या पाहणीचें खातें ) ( ५ ) 'आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया' ( प्राचीन अवशेषांच्या पाहणीचें खातें ) ( ६ ) 'मीटिऑरॉलॉजी' ( वायुमान-खातें ) ( ७ ) 'इरिगेशन' ( पाट—बंधारा खातें ) इत्यादी खातीं आहेत.

सन १९२३ सालापर्यंत या खात्यांतून होणाऱ्या संशोधनाचा आढावा प्रतिवर्षी 'बोर्ड ऑफ सायन्टिफिक् ॲडव्हाइस फॉर इंडिया' ह्या तज्ज्ञांच्या समितीपुढें ठेवण्यांत येऊन नंतर त्याचा आढावा व पुढील वर्षाचा कार्यक्रम लंडन येथील 'रॉयल सोसायटी'च्या 'इंडियन कमिटी'पुढें ठेविण्यांत येई व या कमिटीच्या सल्ल्यानें संशोधनाचा कार्यक्रम ठरविण्यांत येई. याशिवाय इतर खात्यांतील अधिकारी सुद्धां फावल्या वेळांत संशोधन करीत व कांहीं थोडे हिंदी लोकही त्यांत भाग घेत.

परंतु खाजगी संस्था किंवा विद्यालयें यांतून बहुधा संशोधन होत नसे. हिंदी लोक संशोधनास नालायक असेंही समजण्यांत येई.

## हिंदी विद्यापीठें व शास्त्रीय संशोधन

सुमारें शंभर वर्षांपूर्वी भारतांत विद्यापीठें स्थापण्यांत आलीं. त्यांचें मुख्य ध्येय राज्यकारभाराकरितां लागणारे दुय्यम अधिकारी तयार करण्याचें होतें. गरजेपेक्षां जास्त लोक तयार होऊं लागतांच "विद्येकरितां विद्या, नोकरीकरितां नव्हे" असें त्यास सांगण्यांत येऊं लागलें. परंतु उच्च शिक्षणाची व संशोधनाची सोय विद्यापीठांत केली गेली नाहीं. याचें एक कारण म्हणजे येथील विद्यापीठांतील प्रमुख प्राध्यापकांच्या जागा गोऱ्या लोकांकरितांच राखलेल्या होत्या. या प्रतिकूल परिस्थितींतही कै. केरूनाना छत्रे, कै. डॉ. भांडारकर, कै. शं. बा. दीक्षित अशासारखे संशोधक निपजले. परंतु संशोधक तयार करण्याची पद्धतशीर योजना मात्र कोठेंही नव्हती. ही परिस्थिति कमीजास्त प्रमाणांत सर्व देशभर पहिल्या महायुद्धाच्या सुरुवातीपर्यंत चालू होती.

हिंदी विद्यापीठांतून शास्त्रीय विषयांत संशोधन होण्यास आवश्यक अशी सुधारणा करण्याचा प्रयत्न लॉर्ड कर्झन ह्यांच्या 'विद्यापीठांच्या सुधारण्याच्या कायद्यां'त केला गेला. त्यांच्या कारकीर्दींत पुसा (बिहार) येथें 'इंपीरिअल ( हल्लीं इंडियन ) इन्स्टिटयूट ऑफ ॲग्रिकल्चरल रीसर्च' ही संस्था स्थापण्यांत आली. त्याचप्रमाणें देशाच्या निरनिराळ्या भागांत ( ॲग्रिकल्चरल कॉलेजें ) कृषि—महाविद्यालयें स्थापण्यांत आलीं. 'इंडिअन रीसर्च फंड असोशिएशन' ही संस्था ह्याच सुमारास स्थापण्यांत येऊन तिच्यामार्फत पगारी संशोधक नेमून वैद्यकशास्त्रांत संशोधन करविण्याचें कार्य सुरू झालें. पुराणवस्तु-संशोधन-खात्याची स्थापनासुद्धां कर्झनच्याच कारकीर्दींत झाली. शास्त्रिय संशोधनाच्या कामीं खरा पुढाकार कलकत्ता विद्यापीठानें घेतला. सर आशुतोष मुकर्जी ह्यांच्या प्रयत्नांनीं इ. स. १९१३ मध्यें सर तारकनाथ पालीत व सर रासबिहारी घोष ह्यांनीं दिलेल्या देणग्यांच्या व्याजांतून केवळ संशोधनकार्य करणारे अध्यापक नेमण्यांत आले व संशोधकांकरितां शिष्यवृत्त्या दिल्या गेल्या. ह्या अध्यापकांच्या जागा शुद्ध हिंदी लोकांसच देण्यांत याव्या व पूर्णपणें लायक अशीं माणसें न मिळाल्यास







# भारतांतील शास्त्रीय संशोधनाची संघटना

होतकरू माणसें नेमून, त्यांना परदेशांत विशेष शिक्षणासाठीं पाठवून तयार करून आणावें अशी योजना केली होती. पदवीनंतरचें शिक्षण केवळ विद्यापीठानेंच द्यावयाचें अशी योजना करून ह्याकरितां होणाऱ्या खर्चाची तरतूद मॅट्रिक्युलेशन व इंटर ह्या परीक्षांच्या फीपैकीं ½ रक्कम ह्या कार्याकडे लावून केली. तसेंच ह्या अध्यापकांच्या हाताखालीं इतर संशोधक नेमून शिक्षणाची व संशोधनाची सोय करण्यांत आली. पदवीनंतरचें शिक्षण देण्याची व्यवस्था १९२० पासून झाली व आजतागायत हें काम चालू आहे. अशा रीतीनें १९२० पासून जे कलकत्ता विद्यापीठांत संशोधन सुरू झालें तें आजपर्यंत वाढत्या प्रमाणांत चालू आहे.

पहिल्या महायुद्धानंतर जीं नवीन विद्यापीठें ( डाका, अलाहाबाद, म्हैसूर, लखनौ, बनारस, अलिगड येथें ) स्थापिलीं गेलीं त्या सर्वांतून संशोधनकार्यावर भर दिला गेला. अशा रीतीनें देशांतील निरनिराळ्या विद्यापीठांतून जरी संशोधनास सुरुवात झाली तरी संशोधनाचें कार्य संशोधकाच्या इच्छेवर अवलंबून असल्यानें त्याला कांहीं विशिष्ट दिशा किंवा धोरण नव्हतें. हीच स्थिति आज बहुतांशीं कायम आहे.

विद्यापीठें व सरकारी खातीं यांशिवाय आणखी एका निराळ्या प्रकारच्या संस्थांतून संशोधनकार्य सुरू झालें होतें. यांतील सर्वांत मोठी संस्था दानशूर ज. न. टाटा यांच्या देणगींतून निघालेली बंगलोर येथील 'इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स' ही होय. या संस्थेंत प्रारंभीं रसायनशास्त्राचेंच संशोधन होत असे. आज या संस्थेचा व्याप पुष्कळच वाढला असून येथें विज्ञान, रसायन, विद्युत्-स्थापत्य, विमानस्थापत्य इत्यादि विविध विषयांत संशोधन होत आहे.

दुसरी नांव घेण्यासारखी संस्था म्हणजे कै. डॉ. महेंद्रलाल सरकार यांनीं स्थापिलेली कलकत्याची "इंडियन असोशिएशन फॉर दि कल्टिव्हेशन ऑफ सायन्स' ही होय. आरंभीं संस्थेंत संध्याकाळीं कॉलेजचे वर्ग भरविण्याचें कामच होत असे. परंतु सर चं. वें. रामन् हे चिटणीस झाल्यापासून या संस्थेचा कायाकल्प झाला व येथें केवळ संशोधनकार्य होऊं लागलें. सर सी. व्ही. रामन् यांना मिळालेलें नोबेल-पारितोषिक हें येथें त्यांनीं व त्यांचे विद्यार्थी डॉ. के. एस्. कृष्णन् यांनीं केलेल्या 'रामन् इफेक्ट्स्'वरील संशोधनामुळेंच, हें लक्षांत घेतलें म्हणजे येथील कार्याचा दर्जा स्पष्ट होईल.

कै. सर जगदीशचंद्र बोस यांनीं स्थापिलेली 'बोस इन्स्टिटयूट' ही संस्थाहि अशाच दर्जाची होय. डॉ. भाभा यांनीं स्थापिलेलें मुंबई येथील 'टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रीसर्च' व कै. डॉ. बिरबल सहानी यांनीं स्थापिलेली लखनौ येथील 'पॅलिओ-बॉटॅनिकल इन्स्टिटयूट' ह्या अशाच तऱ्हेच्या संस्था होत. डॉ. लिमये यांची 'रसायन-निधि' ही संस्था व 'महाराष्ट्र असोशिएशन फॉर दि कल्टिव्हेशन ऑफ सायन्स' ही संस्था, अशा पुण्यांतील या संस्थांचे ध्येयही वरीलसारखेंच आहे.

## भारतीय विज्ञानपरिषदेचा जन्म

वर वर्णिल्याप्रमाणें हिंदुस्थानांत संशोधनाचा पाया रचिला जात असतां, संशोधक, विद्यार्थी व शास्त्रप्रेमी सामान्य जन ह्यांमध्यें विचारविनिमय व परस्परांचा परिचय घडवून आणण्याकरितां 'इंडिअन सायन्स कॉंग्रेस' ह्या संस्थेची स्थापना फेब्रुवारी १९१४ मध्यें झाली. ह्या संस्थेची घटना इंग्लंडांतील 'ब्रिटिश असोशिएशन फॉर दि ॲड्व्हान्समेंट ऑफ सायन्स' या संस्थेच्या नमुन्यावरच केली होती. 'इंडियन सायन्स कॉंग्रेस'चे उद्देश त्या संस्थेच्या सारखेच होते. हे उद्देश पुढीलप्रमाणें[1]

---

१ ब्रिटिश असोशिएशनचे उद्देश :

To give a stronger impulse and more systematic direction to scientific inquiry, to promote the intercourse of societies and individuals interested

[ तळटीप पुढील पानावर चालू








होत : 'शास्त्रीय संशोधनाला जोराची चालना देणें व पद्धतशीर वळण लावणें, देशांतील शास्त्रीय संस्था व व्यक्ती ह्यांच्यामधील दळणवळण वाढविणें, शास्त्राच्या शुद्ध व उपयुक्त शाखांकडे लक्ष वेधणें आणि शास्त्राच्या प्रसाराच्या मार्गांतील सार्वजनिक स्वरूपाच्या अडचणी दूर करणें.' ह्या संस्थेची स्थापना झाल्यापासून तिचीं अधिवेशनें दरवर्षी हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रमुख शहरीं भरविण्यांत आलीं आहेत व ह्या निमित्तानें देशांतील संशोधनाचा आढावा घेण्याचें कार्य चालत आलें आहे. इंडिअन सायन्स काँग्रेसचें येतें अधिवेशन हें पुण्यास जानेवारी १९५० च्या पाहिल्या आठवड्यांत होणार आहे.

## विशेषज्ञांच्या समित्या

हिंदी विद्यापीठांतून शास्त्रीय संशोधनास जी सुरुवात झाली त्याचा एक परिणाम म्हणजे शास्त्राच्या विविध शाखांच्या अभ्यासकांनीं स्थापिलेल्या विशेषज्ञांच्या समित्या ( Learned Societies ) होत. ह्या समित्यांचे उद्देश, त्या त्या शाखांच्या अभ्यासकांना विचारविनिमयाची संधि देणें, संशोधनपर चर्चा घडवून आणणें व एतद्विषयक लेख छापणें, हे होत. अशा तऱ्हेची पाहिली समिति १९२० सालीं 'इंडिअन बोटॅनिकल सोसायटी' ह्या नांवानें स्थापन झाली. त्यानंतर 'इंडिअन केमिकल सोसायटी' 'इंडियन फिजिकल सोसायटी', 'इंडियन सोसायटी ऑफ सॉइल सायन्स', 'इंडियन झुऑलॉजिकल सोसायटी', 'इंडियन माइनिंग अॅन्ड मेटॅलर्जिकल सोसायटी' इत्यादी अनेक भारतीय समित्या स्थापन झाल्या व त्या आपआपल्या विषयांत कार्य करीत आहेत.

## अखिलभारतीय शास्त्रीय संस्था

देशांतील संशोधन-कार्याचें नियंत्रण व मार्गदर्शन करण्याकरितां पाश्चात्य देशांत संस्था आहेत. इंग्लंड-मधील अशा तऱ्हेची प्रसिद्ध संस्था 'रॉयल सोसायटी ऑफ लंडन' ही होय. ह्या संस्थेंत ज्यांनीं संशोधनामुळें नांव मिळविलें आहे अशाच लोकांचा प्रवेश होऊं शकतो. दरवर्षी सर्व विषयांच्या संशोधकांतून केवळ १५च सदस्यांची (सध्यां २५) निवड होऊं शकते. ह्या सदस्यांच्या वैयक्तिक निपुणतेमुळेंच संशोधनाचें नियंत्रण व मार्गदर्शनाचें कार्य त्यांच्या हातून होऊं शकतें.

अशा तऱ्हेची संस्था आजपर्यंत हिंदुस्थानांत नव्हती. देशांतील संशोधन-कार्याचा वाढता व्याप व सरकारास स्वतंत्र शास्त्रविषयक सल्ला मिळण्याची भासत असलेली आवश्यकता लक्षांत घेऊन 'अॅकॅडेमी ऑफ सायन्सेस' स्थापण्याची योजना सर चं. वें. रामन् ह्यांनीं १९३३ सालीं काढली. ह्या योजनेचा विचार १९३४ मध्यें मुंबईस भरलेल्या 'सायन्स काँग्रेस'च्या अधिवेशनांत होऊन ही योजना सिद्धीस नेण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत आली. कमिटीच्या शिफारशीनुसार 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सेस, इंडिया' ह्या नांवानें ही संस्था १९३५ सालीं कलकत्ता अधिवेशनांत स्थापण्यांत आली. ह्या संस्थेच्या कार्यासंबंधीं

---

तळटीप मागील पानावरून चालू ]

in science in different parts of the country, to obtain a more general attention to the objects of pure and applied science and the removal of any disadvantages of a public kind which may impede its progress.

इंडियन सायन्स काँग्रेसचे उद्देश :

The advancement of Science in India by the annual holding of Congress and the doing of all such things as are incidental or conducive to our object.








मध्यंतरीं मतभेद उत्पन्न झाल्यामुळें मूळ योजने-प्रमाणें हिंदुस्थानांत एकच संस्था स्थापण्याऐवजीं दोन संस्था अस्तित्वांत आल्या. ही दुसरी संस्था म्हणजे सर चंद्रशेखर वेंकट रामन् ह्यांनीं स्वतःच्या नेतृत्वाखालीं बंगलोर येथें स्थापिलेली ' इंडियन ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस ' ही होय. अशा रीतीनें हिंदी शास्त्रज्ञांत फूट पडली व ह्या कारणानें ह्या दोन्ही संस्थांचें कार्य अपेक्षे-प्रमाणें होऊं शकलें नाहीं ही खेदाची गोष्ट होय. ह्या फुटीचा आणखी एक परिणाम म्हणजे अलाहाबाद येथें डॉ. मेघनाथ सहा ह्यांच्या नेतृत्वाखालीं कार्य करीत असलेल्या ' युनायटेड प्रॉव्हिन्सेस ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस ' या संस्थेचें ' नॅशनल ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस ऑफ इंडिआ ' ह्या नांवानें झालेलें रूपांतर होय. अशा रीतीनें हिंदुस्थानांत अखिलभारतीय स्वरूपाच्या तीन ' सायन्स ॲकॅडेमी ' निर्माण झाल्या.

शास्त्रीय विशेषज्ञांच्या समित्या आणि 'ॲकॅडेमी' ह्यांतील मुख्य फरक म्हणजे विशेषज्ञांच्या समित्या एकाच विषयाला वाहिलेल्या असतात, तर ॲकॅडेमी-मध्यें सर्व शास्त्रांच्या शाखांचा विचार होतो. दुसरा फरक म्हणजे विशेषज्ञांच्या समितींत त्या त्या शाखेच्या सर्व अभ्यासांचा समावेश होतो. परंतु ॲकॅडेमीचे सभासद त्या त्या विषयांतील निष्णात लोकांमधूनच निवडले जातात. ॲकॅडेमीच्या सभासदांची संख्या मर्यादित असून हे निरनिराळ्या शास्त्रांतील निष्णात संशोधक असतात.

## संशोधनाला आर्थिक साहाय्य

अशा रीतीनें शास्त्रीय विषयांच्या संशोधनाची सोय विद्यापीठांतून झाली व ह्या विषयांची चर्चा करण्यासाठीं विशेषज्ञांच्या समित्या व ॲकॅडेमी निर्माण झाल्या, तरी शास्त्रीय संशोधनाला लागणाऱ्या पैशाची व उपकरणांची सोय आवश्यक तितकी नव्हती. ह्यामुळें कित्येक संशोधकांना आपलें कार्य करणें कठीण होत असे. ही गरज भागविण्याकरितां संशोधनकार्यास आर्थिक मदत करणाऱ्या अशा कांहीं संस्था अस्तित्वांत येणें जरूर होतें. त्याही क्रमानें स्थापिल्या गेल्या.

मागें उल्लेखिल्याप्रमाणें लॉर्ड कर्झन ह्यांच्या कारकीर्दींत वैद्यकीय संशोधनासाठीं ' इंडिअन रीसर्च फंड असोशिएशन ' ह्या नांवाची संस्था अस्तित्वांत आली होतीच. ही संस्था कांहीं संशो-धकांना किंवा संस्थांना आर्थिक साहाय्य देऊन संशोधन करून घेत असे. कृषिशास्त्र व तदनुषंगिक इतर शास्त्रें ह्यांमध्यें संशोधन करण्याकरितां तसेंच ह्या विषयांतील होणाऱ्या संशोधनाचें नियोजन व नियंत्रण करण्याकरितां 'लिनलिथगो कमिशन'च्या शिफारशीनुसार ' इंपीरियल (हल्लीं इंडियन) कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रीसर्च ' ह्या नांवाची संस्था १९२० सालीं स्थापिली गेली. ह्या संस्थेला प्रथम दर वर्षी ५ लक्ष रुपये खर्चासाठीं देत असत. हल्लीं ह्या संस्थेच्या खर्चाकरितां हिंदुस्थानांतून निर्यात होणाऱ्या कांहीं पदार्थांवर बसविलेल्या कराचें उत्पन्न लावून दिलें आहे. ह्या संस्थेच्या कार्याचा व्याप अलीकडे पुष्कळच वाढला असून विशिष्ट पिकांच्या संशोधनाकरितां निरनिराळीं केंद्रें उत्पन्न करण्यांत आलीं आहेत. दुसऱ्या महायुद्धाच्या सुरवातीनंतर शास्त्रीय ' इंडिअन कौन्सिल ऑफ सायंटिफिक ॲन्ड इंडस्ट्रिअल रीसर्च ' (शास्त्रीय व औद्योगिक संशोधना-चें भारतीय मंडळ) ह्या नांवाची संस्था स्थापण्यांत आली. देशांत होत असलेल्या संशोधनाचा आढावा घेणें व संशोधनाला देशाच्या गरजांनुसार योग्य असें वळण लावणें इत्यादि कार्य करण्यासाठीं एक मध्यवर्ती संस्था पाहिजे होती. हें कार्य करण्यासाठीं अमेरिकेंतील ' नॅशनल रीसर्च कौन्सिल 'सारखी एखादी संस्था असावी व तिनें देशांतील सर्व विषयांतील संशोधनाचें संघटन करावें अशी सूचना ' नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ सायन्सेस ' ह्या संस्थेनें केली होती. आजमितसि तरी अशा तऱ्हेची मध्यवर्ती संस्था अस्तित्वांत येण्याचा संभव दिसत नाहीं.

ह्या सर्व योजनांशिवाय जें संशोधन विद्यापीठें, व्यक्ती किंवा खाजगी संस्था ह्यांच्याकडून सामग्रीच्या अभावीं होत नाहीं अशा प्रकारचें मौलिक संशोधन करण्याकरितां त्या त्या विषयांसाठीं राष्ट्रीय प्रयोग-शाला अस्तित्वांत येत आहेत. अशा तऱ्हेची रसायन/ शास्त्राची राष्ट्रीय प्रयोगशाला पुण्यांत










अनुक्रमणिका

स्थापन होणार असून तिच्या उभारणीचें कार्य सुरू आहे. संशोधनास लायक अशीं माणसें हिंदुस्थानांत पाहिजे तितकीं मिळत नसल्यानें, या प्रयोगशालांचें कार्य सुरू होण्याच्या कामीं कांहीं अडचणी उत्पन्न होत आहेत. तथापि या अडचणी कालांतरानें दूर होतील अशी खात्री वाटते.

व्यापक दृष्टीनें पाहिल्यास, हिंदुस्थानांतील संशोधनाचें कार्य अद्यापि प्रथमावस्थेंत असल्याचें दिसून येतें. कांहीं नामांकित व्यक्ती वगळल्यास हिंदी संशोधकांचा दर्जा आंतरराष्ट्रीय दृष्ट्या मध्यमच असल्याचें कबूल करावें लागेल. हा दर्जा वाढवावयाचा असेल तर विद्यापीठांच्या पदवीपरीक्षांचा दर्जा हल्लींच्याहून वरच्या प्रतीचा करावा लागेल व विद्यापीठांत संशोधक अध्यापक नेमावे लागतील. परीक्षा हेंच ध्येय ठेवून चालावयाचें नाहीं. याहि दिशेनें पाऊल पुढें पडत आहे; परंतु तें फार मंद गतीनें. संशोधनकार्यास हल्लींच्याहून फार मोठ्या प्रमाणानें आर्थिक मदत करावी लागेल. असें झालें व संशोधकांनीं आपल्या देशाच्या गरजा येथें उपलब्ध असलेल्या सामग्रींतूनच कशा भागवितां येतील या विचारानें जर संशोधन केलें तर देशांतील बरेच प्रश्न सुटतील असें वाटतें.

---

## ' लयतत्त्वाचें अधिराज्य '

**'अभिरुची'**च्या १९४९ च्या **दिवाळी अंकांत** श्री. **ना. ग. जोशी** यांनीं ' लयतत्त्वाचें व्यापक स्वरूप ' असा एक लेख लिहिला असून त्यांत लयतत्त्व हें मूळ निसर्गांत कसें आहे, मानवजातीच्या विकासाच्या निरनिराळ्या अवस्थांतून या लयतत्त्वाचा स्फूर्तिप्रद विलास कसा दिसून आला आहे, याचें ऐतिहासिक दृष्ट्या दिग्दर्शन केलें आहे. " निसर्गांतील लयतत्त्वाचें स्वरूप कोणत्याहि निश्चित नैसर्गिक क्रियेंतील समतोलपणांत आढळतें. समुद्राच्या लाटा, प्रकाशलहरी, ध्वनिलहरी किंवा विद्युच्छक्ति यांमधील कंपनक्रियेंत हेंच तत्त्व मूलभूत असतें...... माणसाला ही जी स्वराची देणगी मिळाली ती लयतत्त्वाचें सर्वांत महत्त्वाचें कार्य आहे.... मानवाचें इतर प्राण्यांहून वेगळेपण ज्या तीन गोष्टींत दिसतें त्यांपैकीं दोन गोष्टी मौलिक लयतत्त्वाच्या द्योतक आहेत—उभें रहाणें व शब्द बोलणें. ( तिसरी गोष्ट म्हणजे पंजाची विशिष्ट रचना की जिच्यायोगें त्याला बोटांचा पृथक्पणें उपयोग करतां येतो. ).... ( लयतत्त्वाचा ) सृजनक्षम विकास माणसानें आपल्या स्वतंत्र शक्तीनें केला. ही शक्ति म्हणजे निसर्गनियमांनीं उत्पन्न होणाऱ्या पुनरावर्तनाचें यांत्रिक स्वरूप गौण करून एखादी लयबद्ध क्रिया सहजीं करण्याची माणसाला लाभलेली मानसिक ( Kinaesthetic ) स्मृतिशक्ति होय. यायोगेंच त्याच्यांत ' कन्डिशन्ड रिफ्लेक्स ' निर्माण होत असतो. या मानसिक शक्तीमुळें त्यानें जी वैयक्तिक व सामाजिक प्रगति केली आहे त्यांत ही लयबद्ध गति आढळून येते. विशेषतः धार्मिक विधी, संस्कारसमारंभ, सामाजिक परंपरा, विविध हुन्नरकला आणि लोकजनित कला यांमध्यें ती प्रामुख्यानें आढळते.








डॉ. श्रीधर दत्तात्रय लिमये

# रसायनशास्त्रांतील परिभाषा

रसायनशास्त्रांतील पारिभाषिक शब्द अनेक प्रकारचे आढळतात. कांहीं मूलद्रव्यवाचक असतात; कांहीं त्यांच्या संयोगांचे व मिश्रणांचे असतात. कांहीं साधनसामग्रीविषयक असतात, तर कांहीं पद्धति, प्रक्रिया, कल्पना वा सिद्धांत यांच्या वाचक असतात. त्याचप्रमाणें निरनिराळ्या परिमाणांचे वाचक असेहि कांहीं शब्द रासायनिक विवेचनांत वापरावे लागतात. शास्त्रीय परिभाषा भारतीय असावी असें म्हणणारांतहि वरील प्रकारच्या शब्दांतील कोणत्या समूहांतील इंग्रजी शब्दांचे भारतीय प्रतिशब्द बनवावेत याविषयीं सध्यां एकवाक्यता नाहीं. या प्रश्नाचा बिकटपणा वाढण्याचें आणखी एक कारण असें आहे कीं ज्यूल, वॅट, फॅरड, कूलम्ब यासारखीं परिमाणें; किंवा जर्मॅनियम्, पोलोनियम्, हाफ्नियम यांसारखीं मूलतत्त्वांचीं नांवें; किंवा बॉइल, गेल्यूसॅक, अव्होगड्रो, ले चाटेलियर यांचे सिद्धान्त; किप्स ॲपॅरेटस्, गाइस्लर ट्यूब, लीबिग् कन्डेन्सर इत्यादी साधनांचीं नांवें—यांच्या संबंधांत त्या त्या संशोधकांच्या भावना वा त्यांच्याविषयींच्या इतरांच्या पूज्य भावना निगडित आहेत हें होय. त्याचप्रमाणें "हेलियम"सारखीं नांवें शास्त्रीय इतिहास डोळ्यांपुढें उभा करीत असल्यानें तीं कां म्हणून बदलावींत असाही प्रश्न केला जातो. आणि त्यांत तथ्यही आहे. उलट पक्षीं, तांबें, रुपें, सोनें, लोह, पारद, त्रपु, जस्त ( यशद ) इत्यादी जीं तत्त्वें ( मूलद्रव्यें ) आपल्याकडे पूर्वीपासून ठाऊक आहेत त्यांचीं नांवें टाकून आपण परकीं कां घ्यावयाचीं असाही प्रश्न येतो. बरें, हीं नांवें प्राचीन म्हणून घेतलीं आणि नवीन तत्त्वांचीं परकीं घ्यावयाचीं म्हटलें तर त्यांच्या संयोगांचीं नांवें घेडगुजरी स्वरूपाचीं होणार. जसें, लोह-ऑक्साइड, ताम्र-नायट्रेट, पारद-क्लोराइड, रजत ब्रोमाइड इत्यादि. तेव्हां एक तर सर्वच्या सर्व नांवें परकीं इंग्रजींत आहेत तशींच्या तशीं घेणें किंवा सर्वांना देशी पर्याय काढून ते रूढाविणें असे दोन मार्ग उरतात. यांतील पहिला मार्ग हा अगदीं सोपा, अल्पतम कष्टाचा असल्यानें तिकडेच बऱ्याच जणांचा कल साहाजिकच असतो. परंतु तसें करणें म्हणजे सर्व रासायनिक परिभाषाच इंग्रजी घेतल्याप्रमाणें होतें आणि आपलें मूळ उद्दिष्ट जें सुलभ शास्त्रीय ज्ञानप्रसार तें दूरावतें. म्हणून अधिक कष्ट पडले तरी दुसरा मार्गच संपूर्ण भारतीय परिभाषेच्या पुरस्कर्त्यांनीं स्वीकारला आहे.

प्रस्तुत लेखांत मुख्यतः रासायनिक मूलतत्त्वें नि त्यांचे संयोग ( केमिकल एलेमेंट्स ॲंड देअर कांपाउंड्स ) यांचा विचार करावयाचें योजिलें आहे. पूर्वीची पंचमहाभूतांची कल्पना जाऊन सध्यां शास्त्रज्ञ तत्त्वसंख्या ब्याण्णव असल्याचें मानतात. विश्वांतील अनंत द्रव्यें यांच्या संयोगानेंच निर्माण झालेलीं आहेत. हीं सर्व तत्त्वें कांहीं एकदम सांपडलेलीं नाहींत. त्यांतलि कांहीं माणसाच्या हातीं लागलीं तर कांहीं नंतर शास्त्रज्ञांच्या वाढत्या परिश्रमाबरोबर सांपडत गेलीं. तत्त्वांची मूळ कल्पना रॉबर्ट बॉईल नामक एका









अनुक्रमणिका

इंग्रज रसायनशास्त्रज्ञानें प्रथम पुढें मांडली. जो पदार्थ फोडून दोन भिन्न नि अधिक साधे पदार्थ मिळत नाहींत, अशास त्यानें तत्त्व ( मूलद्रव्य ) ही संज्ञा दिली. सामान्यतः बॉईलचें नांव त्यानें वायूंच्या वर्तणुकीसंबंधीं केलेल्या नियमांमुळें अधिक प्रसिद्ध आहे. ठराविक तापांकाला वायूचा दाब आणि आकारमान यांचा गुणाकार स्थिर असतो, हा तो नियम. परंतु बॉईलचें नांव आधुनिक रसायनशास्त्राच्या आद्य महर्षींमध्यें गणलें जातें याचें कारण त्यानें किमयागारांच्या गूढगुंजनात्मक भाषेपासून रसायनशास्त्राची मुक्तता केली आणि रासायनिक मूलतत्त्वाची कल्पना मांडली, यासाठींच मुख्यत्वेंकरून होय. आधुनिक भौतिक शास्त्राच्या दृष्टीनें बॉईलची वर स्थूलमानानें दिलेली तत्त्वाची व्याख्या तितकीशी समाधानकारक नसली तरी ती सामान्यतः, कामचलाऊ म्हणून वापरण्यास अडचण नाहीं.

आपण मूलतत्त्वांची इंग्रजी नामावली घेऊन हीं नांवें कशीं पडलीं हें पाहूं लागलों तर असें आढळतें कीं, त्यांतील कांहींचा संबंध त्या त्या मूलतत्त्वाच्या गुणधर्मांशीं असतो, कांहींचा त्यांच्या उत्पत्तीशीं असतो, तर कांहींचीं नांवें संशोधकांनीं आपणांस प्रिय असलेल्या भूप्रदेशाच्या नांवावरून दिलीं आहेत. सामान्यतः, महाविद्यालयीन पाठ्यक्रमामध्यें या तत्त्वांचा अभ्यास केला जात असला तरी या नामकरणाकडे फारसें लक्ष विद्यार्थ्यांस पुरवितां येत नाहीं. यापुढें कांहीं तत्त्वांच्या इंग्रजी नांवांविषयींची अगदीं त्रोटक माहिती दिली आहे.

**( १ ) हायड्रोजन** ( Hydrogen )–हें नांव १७८३ मध्यें लव्हायसिए या फ्रेंच शास्त्रज्ञानें दिलें. कारण याच्या ज्वलनानें पाणी बनतें. ग्रीक भाषेंत Hydor पाणी, genes म्हणजे निर्माता, असे अर्थ आहेत.

**( २ ) हेलियम** ( Helium )–सूर्याभोंवतींच्या वातावरणाच्या वर्णलेखावरून १८६८ मध्यें या तत्त्वाचें अस्तित्व शास्त्रज्ञांच्या प्रथम दृष्टोत्पत्तीस आलें. म्हणून Helios = सूर्य, या ग्रीक शब्दावरून त्यांनीं त्याचें नामकरण केलें. पुढें पृथ्वीवर सांपडणाऱ्या कांहीं खनिजांपासूनहि हें मूलतत्त्व मिळतें, असें हिलेब्रांड आणि रॅम्से यांच्या प्रयोगांवरून आढळून आलें.

**( ३ )** लिथिअम ( Lithium )–क्षारक धातूंच्यांत ज्याची गणना होते अशा या तत्त्वाचें नांव, Lithos = दगड, या ग्रीक शब्दावरून आलेलें आहे. हें मूलतत्त्व सिकतेसह संयुक्त अवस्थेमध्यें कांहीं खनिजांमध्यें सांपडतें.

**( ४ ) बेरिलियम** ( Beryllium )– हें क्षारक मृत्तिका धातूंतील सर्वांत हलकें मूलतत्त्व असून तें Beryl नांवाच्या खनिजांत सांपडतें.

**( ५ ) नायट्रोजन** ( Nitrogen )–याचा धात्वर्थ ( Nitre ) निर्माण 'करणारा' असा आहे. Nitre चें रसायनशास्त्रीय नांव 'पोटॅशियम् नायट्रेट' असें आहे. ग्रीक Nitron याचा अर्थ वास्तविकपणें Sodium Carbonate असा आहे; परंतु चॅप्टल नामक शास्त्रज्ञानें ( १८२३ ), ग्रीक Nitron चा अर्थ Nitre आहे, अशा चुकीच्या कल्पनेनें Nitrogen हें नांव दिलें. त्यापूर्वीं लव्हायसिएनें ( १७७२ ) त्याच वायूस Azote 'जीवनास पोषक नसलेला' असें अधिक सार्थ नांव दिलें होतें.

**( ६ ) क्लोरिन** ( Chlorine )– Chloros= 'हिरवट पिंवळा' या ग्रीक धातूपासून हें नांव साधलेलें आहे. या वायूचा शोध १७७४ मध्यें शीले नामक शास्त्रज्ञानें लावला असला तरी त्याचें सांप्रतचें रंगावरून पडलेलें नांव डेव्हीनें १८१० च्या सुमारास दिलें.

**( ७ ) ब्रोमिन** ( Bromine ) – ग्रीक Bromos = तीव्र वास, यापासून हें नांव देण्यांत आलें आहे. याचा शोध १८२६ मध्यें बॅलार्ड नामक रसायनशास्त्रज्ञानें लावला. हें मूलतत्त्व अतिशय जहाल असून हुंगलें असतां नाक, घसा, फुप्फुसें यांचा दाह होतो.

**( ८ ) आयोडिन** ( Iodine )–हें नांव त्याच्या जांभळ्या रंगावरून पडलें ( ग्रीक Iodys= जांभळा ). हें तत्त्व शुद्ध स्वरूपांत १८१२ मध्यें प्रथम हातीं आलें.

**( ९ ) आयर्न** ( Iron )–हें नांव सामान्यतः प्रचारांत असलें तरी त्याच्या संयोगांचीं नांवें बहुतेक





अनुक्रमणिका

( Ferrum ) लोह या शब्दापासून साधिलेली आहेत. उदाहरणार्थ, फेरिक क्लोराइड, फेरोसिलिकॉन, फेरोसोफेरिक ऑक्साइड, इत्यादि.

**( १० ) कोबाल्ट** ( Cobalt )-हें तत्त्व ज्यांत आहे अशीं खनिजें ईजिप्तमध्यें प्राचीन काळापासून कुंभकार वापरीत होते. परंतु प्रत्यक्ष धातु १७३३ मध्यें ब्रांट नामक वैज्ञानिकानें वेगळा केला. कोबाल्ट हें नांव ' कोबोल्ड ' म्हणजे 'भूमिवासी भूत-पिशाच्च' अशा अर्थाच्या जर्मन शब्दावरून आलें असावें आणि त्याचा उगम या धातूच्या विवक्षित खनिजाच्या विषारी गुणधर्मात असावा.

**( ११ ) निकेल** ( Nickel )-कांहीं प्राचीन नाण्यांतून हें क्वचित् आढळून येतें. त्या काळीं वापरण्यांत येणाऱ्या तांब्यांत ( ताम्र ) तें राहून जाई. Kupfernickel नांवाचें एक खनिज आहे. जर्मन भाषेंत त्याचा अर्थ 'फसवें तांबें ( छद्म-ताम्र )' असा आहे. कारण दिसावयास तर हें तांब्याच्या खनिजाप्रमाणें दिसतें; परंतु त्यापासून प्रत्यक्ष तांबें मात्र मिळत नाहीं. क्रोन्स्टेडनें १७५०मध्यें जेव्हां या खनिजांतून एक वेगळा धातु काढला तेव्हां त्यास " निकेल " हें नांव त्यानें दिलें.

**( १२ ) बेरियम** ( Barium )-हें तत्त्वनाम त्याच्या बरायटिस ( बेरियम सल्फेट ) या संयोगावरून आलेलें आहे. हा पदार्थ वजनानें विशेष जड असल्यामुळें त्यास ग्रीक Barys = जड किंवा भारी, या अर्थाच्या शब्दावरून तसें नांव पडलें.

**( १३ ) पोलोनियम** ( Polonium )—हें नांव मादाम क्यूरी या संशोधिकेनें आपल्या मायदेशाचें नांवावरून ( Polinia–पोलंड ) दिलें.

**( १४ ) हाफ्नियम** (Hafnium )–कोपनहेगन नगरांतलि प्राध्यापक कोस्टर आणि हेवसे यांनीं हें मूलतत्त्व प्रथम शोधून काढलें ( १९२२ ) आणि त्या गांवच्या " हाफ्निया " या नांवावरून हाफ्नियम हें नांव बनविलें.

तत्त्वांच्या इंग्रजी नांवांमधील कांहींचा परिचय करून घेतल्यानंतर आतां तत्त्वांसाठीं सुचविण्यांत आलेल्या भारतीय नामकरणपद्धतीचा विचार करूं.

आचार्य रघुवीरांनीं तत्त्वांचें नामकरण करतांना जी पद्धति स्वीकारली आहे ती अशी :

( १ ) प्राचीन काळापासून आपल्याकडे ज्ञात असलेलीं मूलतत्त्वें (दहा).

( २ ) प्राचीन काळापासून ठाऊक असलेल्या पदार्थांशीं निगडित असलेल्या मूलतत्त्वांचीं नांवें त्या पदार्थांचें नांवावरून नवीन बनविलीं ( सोळा ). उदाहरणार्थ, अंगार–प्रांगार=कार्बन; चूर्ण–चूर्णातु=कॅल्शियम; टंकण–टांकण =बोरॉन; कुप्य–कुप्यातु=झिंक; सिकता–सैकता=सिलीकॉन; स्फटी–स्फट्यातु =ॲल्युमिनियम;वैडूर्य–विडूर=बेरिलियम; वंग–वंगक = टेलूरियम

( ३ ) भारतीय रसविदांच्या वापरांत असलेल्या "जारण" या शब्दापासून इंग्रजींतलि ऑक्सिजनचा भारतीय पर्याय "जारक" असा नवा बनविला ( अेक ).

( ४ ) इंग्रजी हायड्रोजन आणि फॉस्फोरस हे व्युत्पत्तिदृष्ट्या संस्कृत उदजन आणि भास्वर यांचे पर्याय होत ( दोन ).

( ५ ) ग्रीक भाषेंतून विशिष्टगुणधर्मदर्शक अशीं अर्गॉन, क्रिप्टॉन,ब्रोमिन, आयोडिन आणि क्रोमियम् अशीं जीं नांवें इंग्रजींत घेतलेलीं आहेत, त्यांचे समानार्थी संस्कृत पर्याय अनुक्रमें मन्दाति, दुराग्री, वर्णातु, जंबुकी, लीनाति असे नवीन बनविले ( पांच ).

( ६ ) वरीलप्रमाणें लॅटिनमधून इंग्रजींत घेतलेल्या फ्लुओरिन, इंडियम, रेडियम आणि रेडॉन यांचे समानार्थी संस्कृत पर्याय तरास्विनी, नैलातु, तेजातु, तैजसाति असे नवे बनविले ( चार ).

( ७ ) सहा तत्त्वांच्या नांवांना उपसर्ग लावून नवीन मूलतत्त्वांचीं नांवें बनविलीं. उदाहरणार्थ, संवर्णातु ( मोलिब्डेनम ); किंविरला (ॲायरोपियम); प्रैजातु ( प्रोटोॲक्टिनियम ).

( ८ ) तत्त्वाच्या अथवा त्याच्या कांहीं संयोगांच्या विशिष्ट रंगावरून किंवा वर्णलेखरेषांवरून किंवा ज्योतीवरून कांहीं नावें दिलीं आहेत ( ११ ). उदाहरणार्थ, आपीतला ( निओडिमियम ); मेचाग्नि ( सेलेनियम ), शोणातु ( स्ट्रॉन्शियम ); हर्यातु ( बेरियम ).








(९) कांहीं तत्त्वांचीं नांवें त्यांचे किंवा त्यांच्या संयोगांचे गुणधर्म ध्यानांत घेऊन, किंवा तीं कोठें किंवा किती प्रमाणांत मिळतात, अथवा त्यांचे उपयोग यांवरून दिलीं आहेत (३७). उदाहरणार्थः– काशातु (कोलंबियम); रोचातु (व्हॅनेडियम); स्तोकातु (स्कँडियम); मृज्यातु (कॅड्मियम); भ्राजातु (मॅग्नेशियम); दहातु (पोटॅशियम); चंडातु (टंग्स्टन); महातु (प्लॅटिनम); निचूषातु (पॅलेडियम).

## संयोगांचीं नांवें

अशा रीतीनें बनविलेल्या नांवांपासून संयोगांचीं नांवें सिद्ध करावयाचीं तर प्रत्यय आणि उपसर्ग हवेत. इंग्रजींत sub-, super-, per-, hypo-, mono-, di-, tri-, poly-, ortho-, meta-, para-, pyro-, -ide, -ite, -ate, -ous, -ic, -onic, -ium, -onium, -ane, -ene, -ol, -al, -one इत्यादी उपसर्ग आणि प्रत्यय वापरले जातात. उदाहरणार्थ, आपण Chlorine हें मूलतत्त्वनाम घेतलें तर त्यापासून chloride, chlorate, hypochlorite, chlorous, chloric, per-chloric, sub-chloride, tri-chloride, इत्यादी अनेक शब्द बनलेले आढळून येतात. भारतीय परिभाषेंत हें काम रघुवीरांनीं उप–, पर–, अति–, ऊर्ध्व–, सम–, परा–; एक–, द्वि–, त्रि–, पुरु–;–एय,–इय,–य,–इक; –इत,–ईन्य,–एन्य,–व,–सु,–आ इत्यादी जुने नवे प्रत्ययोपसर्ग वापरून साधिलें आहे.

उदाहरणार्थ, भास्वर (फॉस्फोरस) या मूलतत्त्वनामापासून भास्वीय, अधिभास्वीय, भास्वित, उपभास्वित, भास्वतातु, भास्वायिक, भास्विरिय, समभास्विक असे शब्द–इंग्रजींतील अनुक्रमें फॉस्फेट, सुपरफॉस्फेट, फॉस्फाइट, हायपो-फॉस्फाइट, फॉस्फोनियम, फॉस्फोनिक, फॉस्फोरिअल, मेटॅफॉस्फोरिक यांचे पर्यायवाचक बनवितां येतात. यावरून, भारतीय परिभाषाही तितकीच लवचिक आणि उपयुक्त कशी आहे हें दिसून येईल.

या पद्धतीची एकदां नीट ओळख करून घेतली म्हणजे नवखेपणामुळें वाटणारा अवघडपणा जाऊन ती सहज अंगवळणीं पडत जाते असा अनुभव आहे. अडचण आहे ती नवीन विद्यार्थ्यांची नसून पूर्वी ज्यांचें इंग्रजीमधून शिक्षण झालेलें आहे त्यांच्याकडून येणारी आहे. परंतु, देशी परिभाषेचा उपयोग करून स्वभाषांतून शास्त्रीय शिक्षण दिल्यास होणारा लाभ एवढा मोठा आहे कीं तो ध्यानीं येतांच आज क्वचित् अपरिचिततेमुळें दिसून येणारी उदासीनता, उपेक्षा वा विरोधी वृत्ति हीं जाऊन तेथें उत्साहाचें आणि आत्मीयतेचें वातावरण निर्माण होइल यांत संशय नाहीं. म्हणूनच भारतीय रसायनशास्त्रज्ञांनीं देशांत रसायनशास्त्राचा प्रसार सुलभतेनें व्हावा यासाठीं रघुवीरांनीं सुचविलेल्या पद्धतीचा अभ्यास करून, त्यासंबंधीं एकत्र विचारविनिमय करून, आवश्यक तेथें ती सुधारून एकदां भारतीय रसायन-परिभाषा सुनिश्चित करून टाकली पाहिजे. अशा प्रकारें सर्वसंमत झालेली शब्दावली प्रत्येकानें शक्य तेथें वापरावयाचें मनावर घेतल्यास ती हां हां म्हणतां रूढ होऊन जाईल आणि आवश्यकतेनुसार त्यांत सुधारणाही होत राहतील. यासाठीं केंद्रीय शिक्षण-विभागानें पुढाकार घेऊन देशांतील रसायनशास्त्रज्ञ आणि भाषाकोविद यांच्या एका प्रातिनिधिक समितीची नियुक्ति करण्याची वेळ खचित आलेली आहे.

---

'ही घटनासमिति सुरू होऊन आज २ वर्षें, ११ महिने १७ दिवस होतील. या अवधींत आपल्या घटनासमितीचीं ११ अधिवेशनें होऊन त्यांना १६५ दिवस लागले. त्यांपैकीं ११४ दिवस घटनेच्या मसुद्यांचा विचार करण्यांत खर्च झाले. घटनामसुद्यांत आज शेवटीं ३९५ (Articles) कलमें व ८ (Schedules) परिशिष्टें आहेत. या घटनामसुद्यांना एकंदर ७६३५ उपसूचना सुचविल्या होत्या. त्यांपैकीं २४७३ उपसूचना प्रत्यक्ष मांडल्या गेल्या.

—डॉ. भी. रा. आंबेडकर, (२५ नोव्हेंबर १९४९)








आचार्य शं. द. जावडेकर

# आमची राज्यघटना आणि आमचें राजकारण

" We must not be content with mere political democracy. We must make our political democracy a social democracy as well ... On January 26, 1950, we will have equality in politics and inequality in social and economic life. We must remove this contradiction at the earliest possible moment, or else those who suffer from inequality will blow up the structure of political democracy which this Assembly has so laboriously built up. "— *Dr. Ambedkar*

हिंदुस्थान स्वतंत्र झाला आणि स्वतंत्र भारताच्या घटनापरिषदेनें स्वतंत्र भारताची एक लोकशाही स्वरूपाची राज्यघटनाहि बनविली. या घटनापरिषदेंत हिंदी राष्ट्रसभापक्षच प्रचंड बहुमतानें नांदत होता. अर्थात् ही राज्यघटना त्या पक्षानेंच बनविली आहे असें म्हटल्यास त्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. परवा या राज्यघटनेचें तिसरें वाचन मंजूर झालें, त्यावेळीं मसुदासमितीचे अध्यक्ष डॉ. आंबेडकर यांनीं या घटनेचें स्वरूप विशद करतांना आणि तिच्यावरील आक्षेपकांना उत्तर देतांना जें भाषण केलें, त्यांतील एक महत्त्वाचा उतारा या लेखाच्या मथळ्याखालीं दिलेला आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असा आहे कीं, " २६ जानेवारी १९५० या दिवशीं राज्यघटना अमलांत येईल, त्यावेळीं आमच्या राष्ट्रीय जीवनांत एक विचित्र विसंगति दिसूं लागेल. ही विसंगति म्हणजे आमची राज्यघटना राजकीय लोकशाहीवर उभारली असून ही राजकीय समता आमच्या सामाजिक व आर्थिक जीवनांत उतरलेली नाहीं. राजकीय समता व स्वातंत्र्य यांची सामाजिक व आर्थिक विषमतेशीं घातली गेलेली ही सांगड तोडून टाकून आपण सामाजिक व आर्थिक समता त्वरित स्थापन केली पाहिजे, नाहींतर इतक्या प्रयासानें या घटना-परिषदेनें राजकीय लोकशाहीचा जो डोलारा उभारला आहे तो जे सामाजिक व आर्थिक विषम-तेनें पीडिले जात आहेत, ते उलथून पाडतील." डॉ. आंबेडकर आमच्या सामाजिक व आर्थिक जीवनाचें वर्णन करतांना म्हणतात : " We have in India a society based on the principle of graded inequality, which means elevation for some and degradation for others. On the economic plane, we have a society in which there are some who have immense wealth as against many who live in abject poverty. Without fraternity and equality, liberty would be no better than a coat of paint ( आमची समाजघटना एकाहून एक श्रेष्ठ अशा सामाजिक थरांनीं बनलेली असून आमच्या आर्थिक जीवनांत कांहींच्या पाशीं





अनुक्रमणिका

विपुल संपत्ति आहे, तर इतरांना नितांत दारिद्र्यांत रखडावें लागत आहे. बंधुभावना आणि समता यांच्या अभावीं स्वातंत्र्य ही केवळ माया ठरणार आहे ! ) ''

डॉ. आंबेडकर यांनीं आजच्या राज्यघटनेचें वर्णन करतांना हे जे उद्गार काढिले, ते अगदीं यथार्थ असून त्या राज्यघटनेच्या चांगुलपणाची किंवा वाईटपणाची कसोटी तिच्यांतून सामाजिक व आर्थिक लोकशाहीची निपज करतां येईल किंवा नाहीं यावरूनच ठरणार आहे, हा बोध आपण त्यापासून घेतला पाहिजे.

## लोकशाहीचें भांडवलदारी स्वरूप

आमच्या देशांत ही जी नवी लोकशाही उदयास येत आहे, तिचें स्वरूप कसें आहे असा प्रश्न केल्यास आज जगांत जिला भांडवलदार लोकशाही ( Capitalist Democracy ) असें म्हणतात, तसेंच तिचें आजचें स्वरूप आहे असें म्हणावें लागतें. सुमारें पावणेदोनशें वर्षांपूर्वी अमेरिका ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून स्वतंत्र बनली व तिनें संयुक्त राज्य स्थापन करून एक संपूर्ण लोकशाही राज्याचा नवा नमुना जगांत निर्माण केला, त्या वेळीं एवढें मोठें राज्य राजावांचून चालूं शकतें, हीच गोष्ट लोकांना अपूर्व वाटली. पण आज हीच अमेरिकन लोकशाही भांडवलदार लोकशाही या नांवानें जगभर प्रसिद्ध झाली आहे. तरी आम्हीं जगाच्या इतिहासांत कांहीं शतकें मागें पडलों असल्यानें अमेरिकन संयुक्त राज्याच्या नमुन्यावर आमच्या भारताची राज्यघटना बनत आहे व जगांत लोकशाहीचा उदय झाल्यानंतर दोन शतकांनंतर का होईना, आमच्या देशांत निदान राजकीय लोकशाही आणि प्रजेचें प्रभुत्व हीं तत्त्वें राज्यघटनेंत नमूद होत आहेत, याबद्दल आम्हांस धन्यता वाटत आहे. पण ज्या लोकशाही राज्याची उभारणी करतांना धनिकांच्या मालमत्तेच्या हक्काला मूलभूत हक्कांत स्थान प्राप्त होतें, पण ज्या राज्याच्या घटनेंत कामगारांच्या काम मिळण्याच्या हक्काला व बेकारभत्ता देण्याच्या सरकारच्या कर्तव्याला केवळ ध्येय म्हणून मान्यता देण्यांत येते, त्या लोकशाहीला धनिकशाही स्वरूप प्राप्त होतें, हा गेल्या दोनशें वर्षांतील जगाच्या इतिहासाचा धडा ज्यांच्या अंतःकरणावर ठसलेला आहे, त्यांना आपल्या देशांत स्थापन होत असणाऱ्या या नव्या भांडवलदार लोकशाहीबद्दल धन्यता न वाटतां, ती राज्यघटना बदलून घेण्याचा हक्क कसा बजावतां येईल, याचाच विचार त्यांच्या मनांत प्रथम येईल, हें उघड आहे.

पं. नेहरू हे राष्ट्रसभापक्षाचे नेते आहेत आणि राष्ट्रसभापक्ष शेतकरी–कामकरी राज्याची, समाजवादाची आणि गांधीवादाची भाषा नेहमीं बोलत असतो, त्यावरून ज्या घटनापरिषदेंत त्या पक्षाचें निर्विवाद बहुमत आहे, त्या परिषदेंतून बाहेर पडणारी राज्यघटना भांडवलदार लोकशाहीपेक्षां श्रेष्ठ प्रतीची राज्यघटना निर्माण करूं शकेल, अशी मोठी आशा ज्यांनीं धरिली असेल, त्यांची निराशा झाल्यावांचून राहणार नाहीं. हिंदुस्थानांतील समाजवाद्यांनीं या घटनापरिषदेशीं, एकदोन अपवाद सोडल्यास असहकारच केला होता. ज्या राष्ट्रसभापक्षाच्या हातीं ही घटनापरिषद् जाणें अपरिहार्य होतें, त्या पक्षांत आपल्या मतास विशेष महत्त्व देण्यांत येत नाहीं हें पाहूनच त्यांनीं या परिषदेशीं असहकार केला व राष्ट्रसभेला समाजवादी बनावेणें शक्य नाहीं असें दिसतांच त्यांनीं तो पक्ष सोडून आपला स्वतंत्र पक्ष स्थापन केला. अर्थात् आजची राज्यघटना समाजवादी बनली नाहीं, याबद्दल त्यांना आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं, किंवा नवी निराशा त्यांच्या पदरांत पडण्याचेंहि कारण नाहीं.

पण राष्ट्रसभापक्षांत जे गांधीवादी होते, त्यांची गोष्ट थोडी निराळी आहे. त्यांनीं या परिषदेंत भाग घेतला होता आणि आपल्या गांधीवादी विचारसरणीची छाप त्या घटनेवर पडेल, अशी त्यांना आशा होती. पण आज जी राज्यघटना तयार होऊन बाहेर पडत आहे, तीवर गांधीवादी आर्थिक व सामाजिक ध्येयांची कांहीं छाप पडली आहे, असें म्हणतां येत नाहीं. यासंबंधीं श्री. शंकरराव देव यांनीं राज्यघटनेच्या तिसऱ्या वाचनाच्या वेळीं, तिला मान्यता देतां देतां, पुढील उद्गार काढिले आहेत :








# आमची राज्यघटना आणि आमचें राजकारण

"While the constitution provided fully for political freedom and democracy, it did not implement the social and economic ideals of Mahatma Gandhi."

अशा प्रकारें या राज्यघटनेंत समाजवादी व गांधीवादी ध्येयांना स्थान मिळालें नसल्यानें ती भांडवलदार लोकशाही बनली आहे, असें म्हटलें तर तें चूक ठरणार नाहीं.

अमेरिकेनें आपली राज्यघटना बनवितांना व्यक्तिस्वातंत्र्याच्या ज्या कल्पना पुरस्कारिल्या किंवा फ्रेंच राज्यक्रांतीच्या पुरस्कर्त्यांनीं ज्या विचारांवर आपल्या राज्यघटनेची उभारणी करण्याचा प्रयत्न केला, त्यांत व्यक्तीच्या मालमत्तेच्या मूलभूत हक्काला प्राधान्य दिलें; पण ज्याच्यापाशीं मालमत्ता नसल्यामुळें केवळ आपल्या श्रमशक्तीच्या विक्रयानेंच ज्याला आपला उदरनिर्वाह करावा लागतो त्या निर्धन कामगाराच्या 'कामाच्या हक्का'चा व 'जीवन-वेतनाच्या हक्का'चा नामनिर्देशहि त्यांनीं केला नाहीं. हें त्यांचें कृत्य अन्यायाचें होतें व त्यामुळेंच त्या विचार-सरणींतून निर्माण झालेली लोकशाही ही भांडवलदार लोकशाही बनते, असा अनुभव युरोप-अमेरिकेंत भरपूर आलेला आहे. लोकशाहीला हें भांडवलदारी स्वरूप यावयाचें नसेल तर समाजवादाची स्थापना करून धनोत्पादनाचीं साधनें राष्ट्रीय मालकीचीं बनविलीं पाहिजेत. पण ही समाजवादी दृष्टि स्वीकारण्याची आमच्या घटनापरिषदेची तयारी आज नसली तरी निदान धनिकांच्या मालमत्तेच्या हक्काप्रमाणें निर्धन कामगारांच्या 'कामाच्या हक्का'चा व 'जीवन-वेतनाच्या हक्का'चा तरी समावेश तितक्याच निष्ठेनें आमच्या राज्यघटनेंत व्हावयास हवा होता. एल्. टी. हॉबहौस हे एक व्यक्तिवादी व प्रागतिक मताचे समाजशास्त्रज्ञ होते. त्यांनीं "प्रागतिकवाद" यावरील आपल्या ग्रंथांतहि या दोन हक्कांना मालमत्तेच्या हक्काइतकेंच महत्त्व देण्यांत आलें पाहिजे असें म्हटलें आहे : "**The right to work and the right to a living wage are just as valid as the** rights of person or property."-(Liberalism p. 159). पण आमच्या राज्यघटनेनें या गरीबांच्या व बेकारांच्या हक्कांना नागरिकांच्या मूलभूत हक्कांत स्थान दिलेलें नाहीं. फक्त "डायरेक्टिव्ह प्रिन्सिपल्स" म्हणून जें एक केवळ ध्येय-दर्शक प्रकरण जोडलेलें आहे त्यांत सरकारनें आपलें आर्थिक सामर्थ्य व आर्थिक उन्नति यांचा विचार करून या हक्कांची प्राप्ति कामगारांना होईल असा प्रयत्न करावा, असा मोघम आशीर्वाद देऊन ठेविला आहे. सरकारनें हे हक्क जनतेला मिळवून देण्यासाठीं धनिकांवर कांहीं भार टाकला पाहिजे याचा किंवा या कामीं मालमत्तावाल्यांवर कांहीं जबाबदारी आहे, याचाहि उल्लेख नाहीं. सारांश, धनिकांना निरुद्योगानें चैनींत जीवित कंठतां येण्यास साहाय्य करणारा स्वामित्वाचा हक्क राज्यघटनेनें सुरक्षित केलेला असून, त्याला बाध आणणाऱ्या कायद्यांविरुद्ध न्यायासनांत जाण्याचा मार्ग आंखून ठेवणारी, पण निर्धनांना काम करण्याच्या शर्तींवरहि जीवनवेतन किंवा बेकारभत्ता देण्याची कोणतीहि कायदेशीर तरतूद न करणारी अशी ही राज्यघटना आहे. म्हणूनच गांधीवादाचीं किंवा समाजवादाचीं ध्येयें तींत अंतर्भूत न झालेली अशी भांडवलदार लोकशाही या राज्यघटनेनें स्थापन होत आहे याची स्पष्ट जाणीव आपण ठेविली पाहिजे. निर्धनांच्या जीवितसाधनांहून धनिकांच्या स्वामित्वाच्या हक्काला अधिक शाश्वती देणारी घटना या राष्ट्रांत शाश्वत टिकणें शक्य नाहीं. गांधीवादी वा समाजवादी ध्येयें जिच्यांत अंतर्भूत झालीं आहेत, अशी नवी राज्यघटना हिच्यांतून निर्माण करणें,हेंच अर्थात् यापुढें गांधीवाद्यांचें व समाजवाद्यांचें ध्येय असलें पाहिजे, असें आम्हांस वाटतें. समाजवाद्यांनीं हीच भूमिका स्वीकारली असून लोकशाही मार्गानें व अनत्याचारी साधनांनीं ही राज्यघटना आम्ही सुधारून घेऊं, असें त्यांचें म्हणणें आहे.

## अमेरिका, ब्रिटन आणि भारत

भारतीय राज्यघटना ही वरकरणीं तरी संयुक्त स्वरूपाची (Federal) आहे. तिचा अधिपति








हा आनुवंशिक राजा नसून लोकनियुक्त अध्यक्ष आहे. या दृष्टीनें तिचें ब्रिटनपेक्षां अमेरिकन घटनेशीं अधिक साम्य आहे. या घटनेनें पोटराज्यें व राष्ट्रीय संघराज्य यांच्यांतील अधिकारांची कायदेशीर विभागणी केली असून सामान्य परिस्थितींत मध्य-सरकारचें पोटराज्यांतील सरकारवर अतिक्रमण होऊं नये अशी व्यवस्था केली आहे; तसें झाल्यास न्यायासनामार्फत हें आक्रमण बेकायदा ठरवून घेण्याची तरतूदही केलेली आहे. त्यामुळें जरी या घटनेप्रमाणें मध्यसरकारची सत्ता मोठी ठेविलेली असली तरी तात्त्विक दृष्टीनें ही घटना ब्रिटनप्रमाणें एककेंद्री नसून अमेरिकेप्रमाणें संयुक्त स्वरूपाची आहे असेंच म्हणावें लागतें. मात्र असामान्य संकटकालीं एखाद्या पोटराज्यांतील सर्वच घटना रद्द करण्याचा हक्क मध्यसरकारला दिला असल्यानें या घटनेचें वर्णन करतांना सामान्य परिस्थितींत संयुक्त पण असामान्य परिस्थितींत एककेंद्री असेंहि करतां येईल. तसें म्हटलें तरी सुद्धां राज्यघटना करतांना तिच्याखालीं नांदणाऱ्या पोटराज्यांनीं राज्याची अडवणूक करूं नये आणि एकंदर राष्ट्रावर आपत्ति येण्याचा धोका निर्माण झाल्यास सर्व राष्ट्र एककेंद्री असल्या-प्रमाणें त्याला वागतां यावें अशी व्यवस्था करण्यांत कांहीं वावगें झालें, असें म्हणतां येणार नाहीं. मात्र या खास अधिकाराचा दुरुपयोग होऊन लोक-शाहीच्या समाजवादी विकासास अडथळा करण्यांत येऊं नये, याबद्दल लोकांनीं दक्षता ठेविली पाहिजे.

घटनाकायद्यानें मध्यसरकार व पोट-सरकारें यांची अधिकार-विभागणी केलेली आहे आणि राष्ट्राधिपति लोकनियुक्त अध्यक्ष ठेविला आहे. या दृष्टीनें जरी आमची राज्यघटना अमेरिकेसारखी दिसली, तरी आमचा अध्यक्ष हा स्वतंत्रपणें सार्वत्रिक मतदारांकडून निवडण्यांत येणार नसून त्यांची निवड पार्लमेंटच करणार आहे. शिवाय त्यांचें मंत्रिमंडळ हें अमेरिकेप्रमाणें त्याला जबाबदार राहणार नसून तें पार्लमेंटला--लोकसभेला--जबाबदार राहणार आहे. म्हणजेच आमचें मंत्रिमंडळ हें अध्यक्षांकित नसून लोकसभांकित राहणार आहे. हीच पद्धति फ्रान्समध्यें स्वीकारलेली असून ब्रिटिश घटनेची नक्कल आहे. ह्या दृष्टीनें पाहिल्यास आमची घटना अमेरिकेपेक्षां ब्रिटिश पद्धतीवर विशेष बनविण्यांत आली असून तिचा योग्य विकास होण्यास, ब्रिटिश पार्लमेंटप्रमाणें आमच्याहि पार्लमेंटांत दोन तुल्यबल संघटित राजकीय पक्ष असण्याची अत्यंत आवश्यकता आहे. जर आमच्या पार्लमेंटांत एकाच पक्षाचें प्रचंड बहुमत बनलें आणि जनतेनें दीर्घकाल एकाच पक्षाला आपली राजनिष्ठा बहाल केली, तर त्या पक्षाला या देशांत एकपक्षीय हुकुमशाही किंवा अनियंत्रित सत्ता स्थापन करतां येईल हें उघड आहे. हा न्याय ब्रिटिश पार्लमेंटलाही लागू असून त्या राष्ट्रांत दोन तुल्यबल संघटित पक्ष अस्तित्वांत असण्याची परंपरा दीर्घकाल टिकून असल्यामुळें तेथें तशी स्थिति होत नाहीं.

आमची राज्यघटना लिखित आहे व ती लवचिक न बनवितां ताठर बनविल्यासारखें दिसत असलें तरी ती बदलण्यास पार्लमेंटांत दोन तृतीयांश बहुमत मिळावें एवढीच अट असल्यानें एकदां येवढें बहुमत मिळविणाऱ्या पक्षाला तींत आपणास अनुकूल असे फेरबदल करण्यास फार सायास पडणार नाहींत. शिवाय या घटनेंत जे नागरिकत्वाचे मूलभूत हक्क नमूद केलेले आहेत, त्यांनाहि शांततारक्षणाच्या हेतूनें बऱ्याच मर्यादा घालण्यांत आल्या आहेत. तात्पर्य, ज्याप्रमाणें मध्यसरकारची अडवणूक करण्याचा प्रयत्न करणाऱ्या घटकराज्याची घटना रद्द करण्याचाहि हक्क मध्यसरकारला देऊन ठेवण्यांत आलेला आहे, त्याचप्रमाणें नागरिक स्वातंत्र्याच्या नांवानें समाजांत गोंधळ माजवितां येऊं नये या दृष्टीनें त्या हक्कांना मर्यादित करून सरकारला कांहीं प्रमाणांत हुकुमशाही अधिकार वापरण्याची सत्ता देणारे कायदे करण्याची मुभा ठेविलेली आहे. अमेरिकन राज्यघटनेंत अशा मर्यादा नमूद नसल्या, तरी पुढें फेडरल कोर्टानें तशा मर्यादा गृहीत धरूनच आपले निर्णय दिले आहेत असें आपल्या या कृत्याचें समर्थन आमच्या घटनेचें समर्थन करणारांनीं केलेलें आहे. हें समर्थन कांहींसें खरें असलें तरी तीन महिनेपर्यंत विनाचौकशी बंदींत ठेवण्यासारख्या तरतुदी अमेरिकन न्यायासनांनीं गृहीत धरलेल्या








नागरिक हक्कांच्या योग्य मर्यादांत अंतर्भूत होऊं शकतील असें वाटत नाहीं. इंग्लंडमध्यें राज्यघटना व मूलभूत नागरिक हक्क हे अलिखितच असल्यानें या बाबतींत आमच्या घटनेची तिच्याशीं तुलना करतांच येत नाहीं.

ब्रिटिश लोकांत आपल्या मूलभूत नागरिक स्वातंत्र्याची भावना इतकी दृढमूल झालेली आहे कीं ते हक्क निसर्गदत्त अथवा जन्मसिद्ध किंवा ईश्वरदत्त आहेत असें गृहीत धरून त्या लोकांनीं त्या हक्कांवर गदा आणणारांवर कायदेशीर इलाज कोणते योजावेत, ते सांगणारे कायदेच तेवढे करून ठेविलेले आहेत. आपल्या निसर्गदत्त नागरिकस्वातंत्र्याचा उगम राज्यघटनेंतून झालेला आहे किंवा तें स्वातंत्र्य आपणांस कोणा राजानें दिलेलें आहे अशी त्या लोकांची भावनाच नाहीं. तो प्रजेचा स्वयंसिद्ध ठेवा असून त्याचें रक्षण करण्यासाठींच राज्य, राजा, राज्यघटना यांचा उगम होत असतो असें ते मानितात. या त्यांच्या नागरिकस्वातंत्र्य-निष्ठेंतूनच त्या राज्यघटनेचा व राज्यनिष्ठेचा उगम झालेला आहे. आमची आजची राज्यघटना ज्यांनीं बनविली त्यांच्या अंतःकरणांत आपण एक लोकशाहीचा नवा प्रयोग आपल्या राष्ट्रांत करीत असून इतर देशांतील राज्यघटना पाहून व त्यांच्या इतिहासापासून धडे घेऊन आपण आपली राज्य-घटना तयार करीत आहोंत अशी वृत्ति आहे. या वृत्तीनें ही राज्यघटना बनविण्यांत आली असल्यानें ती जशी बनावी तशी बनली आहे असें आम्हांस वाटतें. जर येथील जनतेंत खरें स्वातंत्र्यप्रेम, खरी लोकशाही निष्ठा आणि खरी सत्याग्रही वृत्ति निर्माण झाली असेल अथवा होऊं शकेल, तर या राज्यघटनेंतून आपणांस लोकशाही समाजवादी आर्थिक घटना व सत्याग्रही संस्कृति यांचाहि विकास करतां येईल. मात्र ब्रिटिश राष्ट्रांत जसें नागरिक स्वातंत्र्यप्रेम दृढमूल झालें आहे, तशीच आपली सत्याग्रहनिष्ठा दृढमूल झाली पाहिजे आणि समाजवादाची त्वरित स्थापना केल्यावांचून आजच्या जगांत लोकशाही जगूं शकणार नाहीं असा आपल्या बुद्धीचा निःसंदिग्ध निर्णय व दृढ निर्धार झाला पाहिजे.

## जागतिक परिस्थिति

आमच्या राज्यघटनेचा विचार करतांना आज एकंदर जगांत जे युद्धाचे व क्रांतीचे वादळी वारे वाहत आहेत त्यांचाहि विचार केला पाहिजे. अमेरिकेनें जेव्हां आपली संयुक्त लोकशाही राज्य-घटना बनविली त्यावेळीं, आज आम्हीं ज्या परि-स्थितींत आहों त्यांहून, अगदीं भिन्न परिस्थिति त्यांच्या सभोंवार होती. त्यांना बाह्य शत्रूंच्या आक्रमणाची जशी भीति नव्हती, तशीच आपली लोकशाही ही भांडवलदार लोकशाही ठरेल व म्हणून तिच्या विरुद्ध कोणी अंतर्गत क्रांति करून उठेल अशीहि भीतिग्रस्त भावना त्यांच्या मनांत नव्हती. त्यांना फक्त अनियंत्रित राजसत्तेचें व सरंजामशाहीचें भय होतें. राजसत्ता त्यांनीं झुगारून दिली व सरंजामशाही तेथें मुळांतच नव्हती. नीग्रोंना ते पशूच समजत होते. तेव्हां त्यांच्यापासून आपल्या लोकशाहीला धोका येईल अशीहि भीति त्यांना वाटत नव्हती. म्हणून त्यांनीं मध्यसरकार कमकुवत ठेविलें, अध्यक्ष व त्याचे मंत्री यांना लोकसभेंतून अलग ठेविलें आणि कोणालाच सत्ता अनिर्बंध वापरतां येऊं नये असें राज्यघटनायंत्र निर्माण केलें. आमचा काल हा जागतिक महायुद्धांचा काळ असून आम्ही जी भांडवलदार लोकशाही स्थापन करीत आहोंत तिला अंतर्गत कम्यूनिस्ट क्रांतीचा धोका उघड दिसत आहे. अशा परिस्थितींत आमच्या राष्ट्रास अभय प्राप्त करून देण्याचाही एक मार्ग होता. तो मार्ग म्हणजे आमची लोकशाही ही समाजवादी बनविण्याचा दृढ निर्धार करावयाचा आणि रशिया विरुद्ध अमेरिका असें युद्ध झाल्यास आम्ही तटस्थच राहूं, असें निःसंदिग्धपणें जाहीर करावयाचें. पण इतकी समाजवादी निष्ठा आमच्या राष्ट्रांत अद्यापि निर्माण झालेली नाहीं किंवा तितकी सत्याग्रहवृत्तीहि जागृत झालेली नाहीं. यामुळें एकंदर जगांतील भीतिग्रस्त वातावरण,








भांडवलशाही नष्ट न केल्यामुळें अंतर्गत क्रांतीचें भय आणि क्रांतिनिष्ठ आत्मविश्वासाचा एकंदर अभाव—अशा परिस्थितींत आमची घटना आम्हीं बनविली आहे. आज आमच्या राष्ट्रांत ज्या शक्ती जागृत व प्रभावी आहेत त्यांची छाप या राज्यघटनेवर पडली आहे. ही घटना अपरिहार्य आहे व त्याबद्दल कोणी शोक करण्यांत अर्थ नाहीं. जनतेंत लोकशाहीची, नागरिक-स्वातंत्र्याची व सत्याग्रहाची निष्ठा जर जिवंत असेल तर लोकशाही राज्याचें रक्षण करून आम्हांस त्याला समाजवादी स्वरूप खात्रीनें देतां येईल. कम्यूनिस्टांच्या अत्याचारी क्रांतितंत्राचें अवलंबन करण्याचा प्रसंग येथील जनतेवर येणार नाहीं, याबद्दल खात्री बाळगण्यास या राज्यघटनेनें अनुकूल वातावरण निर्माण होऊं शकेल. मात्र त्यासाठीं लोकशाहीनिष्ठ समाजवादी पक्ष आपल्या राष्ट्रांत प्रबल व प्रभावी बनला पाहिजे. तसें न होईल आणि एकटाच राष्ट्रसभापक्ष जनतेची अंधनिष्ठा बळकावून बसेल तर याच राज्यघटनेंतून एकपक्षीय हुकूमशाहीचाहि विकास होण्यास व लोकशाहीचा विनाश होण्यास फार काळ लागणार नाहीं. अर्थात् ही हुकुमशाही धनिकवर्गाचीच होईल व ती या प्रचंड राष्ट्रावर फार काळ राज्य करण्यास मुळांतच असमर्थ असल्यानें अंतर्गत व बहिर्गत संकटांच्या भोंवऱ्यांत सांपडून आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्यच ती गमावून बसेल, हें उघड आहे.

## केंद्रित प्रबल सत्ता अपरिहार्य

अशा प्रकारें कदाचित् हुकूमशाही निर्माण होण्याचा धोका पतकरूनही आपल्या राष्ट्रांत आज एक मध्यवर्ती प्रबल सत्तेचें केंद्र निर्माण करणें अपरिहार्य होतें व तें या राज्यघटनेनें होत आहे हें योग्यच म्हणावें लागतें. मध्यसरकार प्रबल बनवून त्याच्या हातीं सत्ता केंद्रित करण्याचें मुख्य कारण असें आहे कीं, अद्यापि आमचीं पोटराज्यें एकजीवी, स्थिर आणि निश्चित बनलेलीं नाहींत. ब्रिटिशांनीं साम्राज्याच्या सोयीकडे पाहून बनविलेले प्रांत किंवा जुन्या सरंजामशाहीचे अवशेष असलेलीं संस्थानें हींच आमचीं पोटराज्यें आहेत; पण या पोटराज्यांच्या मर्यादा लोकशाही तत्त्वावर बनलेल्या नाहींत. त्या मर्यादा मोडून भाषावार पोटराज्यें स्थापन केल्यावांचून लोकशाही वृत्तीचीं राज्यें निर्माण होणार नाहींत. अशीं नवीं पोटराज्यें एकदम निर्माण करण्यास आज भांडवलशाहीचा विरोध आहे. हा विरोध बाजूस सारून भाषावार नवीं राज्यें निर्माण केलीं तरी ती एक नवी सृष्टि होणार असल्यानें कांहीं काल तरी त्या सर्वांवर एककेंद्री मध्य-सत्तेचें प्रबल नियंत्रण ठेवून त्या सर्वांना कांहींतरी समान सांस्कृतिक ध्येयें स्वीकारून वागण्याची संवय लावणें अवश्य आहे. या दृष्टीनें भाषावार प्रांतराज्यें ताबडतोब स्थापण्यास प्रारंभ करावा असें आमचें मत असलें, तरी या सर्व नव्या सृष्टीवर नियंत्रण ठेवणारें एक प्रबल केंद्रित सरकार आवश्यक आहे असें आमचें मत आहे.

अमेरिकेनें आपली राज्यघटना बनविली त्यावेळीं तिचीं सर्व पोटराज्यें स्वतंत्र वसाहती म्हणून नांदत होत्या. त्यांना लोकशाही पद्धतीनें आपला कारभार करण्याची संवय असून त्या सर्व वसाहती केवळ ब्रिटिश राजाविरुद्ध लढण्यापुरत्या एक झाल्या होत्या. त्याना संयुक्त सरकार हा नवा प्रयोग वाटत होता व मनापासून तें नकोच होतें. आमची परिस्थिति याहून अगदीं भिन्न असून शेंदीडशें वर्षें ब्रिटिशांनीं एककेंद्री राज्य येथें चालविलें होतें आणि त्यांची सत्ता लोकांच्या हातीं घेण्यासाठीं आम्ही राष्ट्रसभेच्या झेंड्याखालीं एक अखील भारतीय राष्ट्रीय पक्ष संघटित केला. त्याच्या अस्तित्वामुळेंच आम्हांस एक नवी राज्यघटना लोकशाही पद्धतीनें विनासायास आली. आतां नवीं भाषावार पोटराज्यें आम्हीं निर्माण करीत आहोंत. त्यांच्या मर्यादा, त्यांच्या निष्ठा व कार्यक्षमता या सर्व अद्यापि अप्रकट आहेत. अशा परिस्थितींत ही नवी सृष्टि निर्माण केली तरी तिची योग्य वाढ होण्यास व अ. भा. राष्ट्रीयत्व अभंग राहण्यास केंद्रित प्रबल मध्यसत्ता आवश्यक आहे. तेव्हां तशी योजना या राज्यघटनेनें केली याबद्दल घटनापरिषदेला दोष देतां येत नाहीं.








पण त्याचबरोबर हेंहि विसरून चालणार नाहीं कीं या राज्यघटनेंत एकपक्षीय हुकूमशाही निर्माण होण्याचा धोका आहे. ही एकपक्षीय हुकूमशाही आज निर्माण झाल्यास ती राष्ट्रसभेच्या व राष्ट्रीयत्वाच्या नांवानें पण भांडवलशाहीची अंकित अशीच होईल. तीहि या देशावर फार काल अनियंत्रित राज्य करूं शकणार नाहीं व अखेरीस अंतर्गत असंतोष आणि बाह्य आघात यांच्या भोवऱ्यांत सापडून त्या हुकुमशाहीचा व आमच्या स्वातंत्र्याचाहि एकाच वेळीं अंत होईल. हें संकट व हा धोका टाळून आपलें राष्ट्रीय स्वातंत्र्य सुरक्षित ठेवणें, येथें लोकशाही राज्य खंबीर बनविणें आणि भांडवलदार लोकशाहीचें त्वरित खऱ्या सामाजिक व आर्थिक लोकशाहींत रूपान्तर करणें हेंच आमच्या नव्या घटनेखालील नवें राजकारण असलें पाहिजे.

## नव्या युगांतील नवें राजकारण

२६ जानेवारी १९५० रोजीं आपण या नव्या राज्यघटनेची स्थापना करून नव्या युगांत पदार्पण करीत आहों. साम्राज्यशाही व सरंजामशाही यांचा अंत झालेला आहे आणि भांडवलशाही एवढा एकच लोकशाहीचा शत्रु आतां उरलेला आहे. ब्रिटन, अमेरिका या राष्ट्रांतील लोकशाहीप्रमाणें आपण या नव्या राष्ट्रांतीलहि लोकशाही पचवून टाकूं अशी आकांक्षा स्वदेशी भांडवलशाहीच्या अंतःकरणांत निर्माण झालेली आहे. ही आकांक्षा नष्ट करण्यास समर्थ असा लोकशाहीनिष्ठ समाजवादी पक्ष आपल्या राष्ट्रांत स्थापन झालेला आहे, हेंच आमच्या राष्ट्राच्या जिवंतपणाचें व आपण स्थापन करीत असलेल्या लोकशाहीच्या उज्ज्वल भवितव्याचें मंगल चिन्ह आहे. हा समाजवादी पक्ष राष्ट्रसभेंतून बाहेर पडल्यापासून आपली निष्ठा त्यानें निःसंदिग्धपणें निश्चित केली असून, लोकशाही मार्गानेंच हिंदी समाजवादाची स्थापना येईल असा कयास बांधून त्यानें कम्यूनिस्टांच्या अत्याचारी साधनांचा उघड निषेध व त्याग केलेला आहे. म. गांधींच्या सत्याग्रही क्रांतितंत्राचा उपयोग करून आपणांस या राष्ट्रांत लोकशाही समाजवादाची स्थापना करतां येईल हें त्याचें आजचें विचारपूर्वक बनविलेलें निश्चित धोरण असून राष्ट्रसभेंतून हा पक्ष बाहेर पडला आहे. त्यामुळें राष्ट्रसभापक्ष केवळ राष्ट्रीय वृत्तीचाच बनला आहे. आजची राज्यघटना त्यानेंच बनविली असून तिच्यांतून हुकूमशाही निर्माण होण्याचा धोका आहे हें त्या पक्षांतील विचारवंतांनाहि मान्य होण्यासारखें आहे.

हा धोका टाळण्यास, आज अधिकारारूढ असलेल्या राष्ट्रीय पक्षाला विरोधी पण पुरोगामी असा लोकशाहीनिष्ठ पक्ष निर्माण करणें आणि जनतेनें कोणत्याहि एकाच पक्षास आपली निष्ठा कायमची बहाल न करतां लोकशाहीनिष्ठ पुरोगामी पक्षाला ती आधिकाधिक देत जाणें, हाच खरा मार्ग आहे. अशा रीतीनें इतर सर्व राष्ट्रांप्रमाणें याहि राष्ट्रांत राष्ट्रीय व समाजवादी असे दोन तुल्यबल पक्ष नांदूं लागले म्हणजे या देशांत जी लोकशाही स्थापन होत आहे, तिचा शांततेच्या मार्गानें व समाजवादी दिशेनें त्वरित विकास होत राहील.

मात्र ही समाजवादी क्रांति यशस्वी व्हावयाची तर ती करणारांनीं केवळ पार्लमेंटरी पद्धतीचा विरोध करूनच स्वस्थ न बसतां ज्या ज्या वेळीं सत्ताधारी पक्ष हुकूमशाही वृत्तीचें वर्तन करील त्या त्या वेळीं संयमानें पण निर्धारानें सत्याग्रही प्रतिकार करून आपल्या लोकशाही निष्ठेचें व नागरिक हक्कांचें संरक्षण त्यांना करावें लागेल. म. गांधींच्या सत्याग्रही राजकारणाचा हा वारसा जे चालवितील ते या राष्ट्रांत अमेरिका व रशिया या दोहोंहूनहि श्रेष्ठ अशी समाजवादी संस्कृति या राष्ट्रांत निर्माण करूं शकतील. तसें त्यांनीं केलें तर जगांतील महायुद्धें व रक्तपाती क्रांत्या यांचें युग संपून नव्या शांततायुगाचा शीतल प्रकाश सर्वत्र फैलावूं शकेल. म. गांधींचा जीवनसंदेश सर्व राष्ट्रानें आत्मसात् करावयाचा तर त्याला याच मार्गानें जावें लागेल. अमेरिका किंवा रशिया यांच्या कक्षेंत सांपडून त्यांच्या मागून जाण्यांत आमचा व जगाचाहि विनाशच आहे, हें ओळखून आजच्या जगांतील आमचें स्थान व कर्तव्य यांची पूर्ण स्मृति ठेवून ती जबाबदारी पार पाडण्यास आम्ही पुढें सरसावलें पाहिजे.








# “आतां आपणांस मार्गदर्शन कोण करील?”

एक[1] शान्त स्निग्धशीतल आवाज म्हणाला,
‘चला, आपण सारे आपल्या जीवनध्येयाकडे जाऊं.’
ओठाओठांवरून या बोलाचे प्रतिध्वनी उमटले : अन्तराअन्तरांतून
हो ज्योत प्रज्वलित झाली आणि एका महायात्रेचें प्रस्थान मांडण्यांत आलें.

ध्येयमार्ग कठीण होता. उभा चढ चढावयाचा होता. कांटेकुटे व दगड जागोजाग पसरले होते.
त्या महान् नेत्याचें पाऊल मात्र सदैव पुढेंच पडत होतें.
समर्थ, दुबळे; तरुण, म्हातारे; मोलाचे महत्तम मान्यवर, माती मळणारे मजूर; सारे लोक
त्याचे अनुयायी होते.
हळूंहळूं कोणी दमूनभागून बाजूला पडले; कोणीं हळूच चोरून आपलें अंग काढून घेतलें;
कुणाकुणाची श्रद्धेची शिदोरी अपुरी पडली.

एक आततायी अचानक उडी घेऊन पुढें आला आणि त्यानें त्याच्यावर आघात केला.
धरित्रीच्या अंकावर त्याचें शरीर अखेरचा विसावा घेत पडलें होतें.
नीरव निशा शान्तस्तब्ध उभी होती.
आणि जाईचा मन्द सुगन्ध वातावरणांत दरवळून राहिला होता.

भयचकित अन्तःकरणानें सारे सहयात्री एकमेकांना म्हणाले,
“आतां आपणांस मार्गदर्शन कोण करील?”
आणि प्राचीनें उत्तर केलें,
‘ज्याचा आपण वध केला तोच अजूनहि आपलें नेतृत्व करील.’

साऱ्यांनी लज्जेनें आपल्या माना खालीं घातल्या. कोणाच्या मुखांतून एक अक्षरहि बाहेर उमटेना.
प्राची पुन्हा म्हणाली,
“आपल्या संशयसागरांत आपण त्याला बुडविलें;
आपल्या क्रोधाग्नींत आपण त्याचा बळी घेतला;
परंतु आपल्या प्रेमानें आपण त्याला पुनरुज्जीवित करूं.
कारण मरणाच्या पार गेलेला हा मृत्युंजय महात्मा आपल्या मरणानेंच आपणां सर्वांच्या
अंतःकरणांत आज चिरंजीव झालेला आहे.”

—रवीन्द्रनाथ ठाकूर, अनुवादक–प्रा. देवदत्त दाभोलकर

---

१ The Immortal Mahatma या Indian Readers' Digest नें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत रवीन्द्रनाथांची Who Is To Guide Us Now ही कविता उद्धृत केलेली आढळली. तिचाच अनुवाद वर केलेला आहे. रवीन्द्रनाथांनीं हीं कविता केव्हां लिहिली याचा शोध मला लागला नाहीं. महात्माजींच्या मृत्यूपूर्वी अनेक वर्षें ती लिहिली गेली असावी ही गोष्ट उघड आहे. परंतु महात्माजींचा जीवनक्रम व त्यांच्या जीवनयात्रेची संभाव्य परिणति हींच रवीन्द्रनाथांना अभिप्रेत असावी असें मात्र प्रत्येक ओळ वाचतांना वाटल्याखेरीज राहत नाहीं.—अनुवादक





अनुक्रमणिका

श्री. भा. म. ऊर्फ बापुसाहेब गुप्ते

# आपल्या राज्यघटनेवरील कांहीं आक्षेप

नवभारताची घटना २६ नोव्हेंबर १९४९ रोजीं राष्ट्रपित्याच्या जयजयकारांत जन्माला आली ! त्या घटनेंतून २६ जानेवारी १९५० रोजीं प्रजासत्ताक नवभारत जन्माला येऊन अवघ्या २० वर्षांपूर्वी हिंदी राष्ट्रानें घेतलेली स्वातंत्र्यप्रतिज्ञा सर्वस्वीं पूर्ण होणार. अलौकिक नेतृत्वाच्या आणि अभिनव तंत्राच्या एका क्रांतींतून घटनेचा जन्म झाला आणि ती स्वतः आपल्या महत्त्वानें भारताच्या इतिहासांत अभूतपूर्व अशा प्रजाराज्याला जन्म देणार ! तिचें हें भाग्य मोठें आहे आणि म्हणून साहजिकच ती परकीयांच्या कुतूहलाचा आणि स्वकीयांच्या वादाचा विषय होऊन राहणार, राहिली आहे ! घटना प्रतिगामी आहे, टाकाऊ आहे, शक्य तितक्या लवकर ती आमूलाग्र बदलली पाहिजे इत्यादी आघात आजच तिच्यावर केले जात आहेत. घटना निर्दोष आहे असें कोणीच म्हणणार नाहीं. झपाट्यानें बदलणाऱ्या ज्या काळांत ती जन्माला आली त्या काळांतील अनिश्चित वातावरणाचा तिच्यावर परिणाम झाला आहे. शिवाय तडजोड-वृत्तिचाहि ठसा तिच्यावर स्पष्टपणें उमटला आहे. घटनासमितींत ठसठशीत मतमोजणी अशी कधीं झालीच नाहीं. सर्व मतभेद तडजोडीनें मिटविले गेले. यामुळें तिला अधिक शक्ति आणि स्थैर्य प्राप्त झालें; परंतु कांहीं दोषहि निर्माण झाले ! पण कांहीं झालें तरी घटना प्रतिगामी आहे वगैरे प्रकारचे आरोप मान्य करतां येणार नाहींत. त्या दृष्टीनें त्यांपैकीं कांहीं आक्षेपांचा विचार या लेखांत करण्याचें योजिलें आहे.

घटनेवरील आक्षेपांचा विचार करतांना जो घटनासमितिवरील आक्षेपामुळें विशेष मूलगामी ठरतो, त्याचा प्रथम विचार करूं. तो म्हणजे घटनासमिति ही प्रौढमताधिकारानें व प्रत्यक्ष निवडणुकीनें निवडून न आल्यामुळें ती अप्रातिनिधिक आहे व त्यामुळेंच घटना प्रतिगामी झाली आहे. तात्त्विक दृष्ट्या समिति तितकीशी प्रातिनिधिक नाहीं हें म्हणणें बरोबर ठरेल; परंतु वस्तुतः तें खरें नाहीं. प्रौढमताधिकारानें निवडणुकी करण्यास १९४६ मध्यें वेळ असता तर त्यांचा निकाल काय झाला असता ? प्रचंड बहुमतानें कॉंग्रेसचाच विजय झाला असता याबद्दल शंका सुद्धां वाटण्याचें कारण नाहीं. मग कॉंग्रेसच्याच विद्यमानें निवडून आलेली सध्यांची घटनासमिति लोकमताची प्रातिनिधि नाहीं व तिनें तयार केलेल्या घटनेंत प्रचलित लोकमताचें प्रतिबिंब नाहीं असें कसें म्हणतां येईल ? त्या घटनेंत ज्या उणीवा आहेत त्यांना सध्याचें लोकमत अनुकूल नाहीं असाच त्याचा अर्थ. जें आडांत नाहीं तें पोहऱ्यांत कोठून येणार ?

## प्रौढमताधिकार आणि सामाजिक समता

घटना प्रतिगामी आहे हें म्हणणें एकतर साफ चुकीचें किंवा पक्षांधतेचें आहे. घटनेचा मुख्य पाया म्हणजे मतदानाचा हक्क व तो तर संपूर्ण लोकशाही स्वरूपाचा आहे. घटना ध्येयवादानें उजळलेली नसती तर प्रौढमताधिकाराचा समावेश तिच्यांत झाला नसता. लोकशाहीचें माहेरघर जें इंग्लंड तेथें प्रौढमताधिकार १९२८ पर्यंत नव्हता; युरोपीय संस्कृतीचें आगर जो फ्रान्स देश तेथें तर तो १९४६ पर्यंत नव्हता; इटलींत १९४७ पर्यंत नव्हता ! कोणी म्हणतील








की अलीकडे लोकशाहीच्या तत्त्वाचा प्रसार फार झपाट्यानें झाला आहे; सबब प्रौढमताधिकार हा आतां ओघानेंच आला तरी सुद्धां हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं पुढारलेल्या युरोपांतील बेल्जममध्यें अद्यापि प्रौढमतदान नाहीं. इतकेंच काय तर युरोपांतील अनेक झंजावातांत ज्या चिमुकल्या देशानें अनेक शतकें लोकशाहीचा नंदादीप अखंड तेवत ठेविला आहे त्या स्वित्झर्लंडमध्यें सुद्धां अद्यापि प्रौढमताधिकार नाहीं ! मग ज्यामध्यें बहुतेक समाज निरक्षर व अनभिज्ञ आहे त्या भारतानें केवढा पल्ला एकदम गांठला ! मतदारवर्ग एकदम जवळ जवळ सहा पट वाढणार आहे. अनेक तन्हांच्या टंचाईच्या दिवसांत १७-१८ कोटी मतदारांच्या निवडणुकांची व्यवस्था करण्याच्या मार्गांत व्यावहारिक अडचणींचे केवढे डोंगर पडलेले आहेत हें स्पष्ट दिसत आहे. अशा स्थितींत घटनासमिति जर प्रतिगामी वृत्तीची असती तर तिला युरोपांतील उदाहरणें व प्रत्यक्ष अडचणी यांचा आधार घेऊन प्रौढमताधिकार सहज नाकारतां आला असता !

राजकीय लोकशाहीबरोबर घटनेंत सामाजिक समताहि प्रस्थापित करण्यांत आलेली आहे. कोणत्याहि कारणानें माणसामाणसांत भेद केलेला चालणार नाहीं व अस्पृश्यता पाळणें हा तर गुन्हा ठरविला आहे. घटनेच्या दृष्टीनें या पलीकडे आणखी तरतूद काय करावयाची ? हीं तत्त्वें प्रत्यक्ष आचरणांत लवकर उतरलीं नाहींत तर तो कांहीं घटनेचा दोष नव्हे !

घटनेंतील आणखी एक विशेष उल्लेखनीय व अभिनंदनीय बाब म्हणजे जातवार प्रतिनिधित्वाचें उच्चाटन. ज्या घातकी तत्त्वानें देशाची अखेरीस चिरफाड केली, त्याला एकदम मूठमाती देऊन त्याच्या थडग्यावरच आपण आपली नवीन घटना उभारूं शकलों ही काय कमी अभिमानाची गोष्ट आहे ! या बाबतींत अल्पसंख्याकांच्या प्रतिनिधींचे व विशेषतः ज्यांनीं पुढाकार घेतला त्यांचें अभिनंदन करावें तितकें थोडें आहे. परंतु ज्या काळानें चलचित्रपटाच्या वेगानें ही क्रांति घडवून आणली त्याचेहि आभार मानले पाहिजेत. समितीनें मसुदापूर्वचर्चेंत स्वतंत्र मतदारसंघ जरी काढून टाकले होते तरी जातवार राखीव जागांची तरतूद केली होती. त्यापुढील प्रगतीचा टप्पा दहा वर्षांपूर्वी येईल अशी कोणाला कल्पना होती ? घटनासमितीनें घटना तयार करण्याला फार वेळ घेतला असा सार्वत्रिक गैरसमज आहे. डॉ. आंबेडकरांनीं इतर घटनासमित्यांशीं तुलना करून त्याला उत्तर दिलेंच आहे. पण हा उशीर झाला असे जरी धरलें तरी त्यापासून केवढा फायदा झाला ! घटनेचें काम एक किंवा दोन वर्षांत संपलें असतें तर जातवारीचें तत्त्व घटनेंत राहिलें असतें व निदान पहिल्या निवडणुकी तरी त्या विषारी पद्धतीनें झाल्या असत्या ! समितींतील मी आपल्या अखेरच्या भाषणांत म्हटल्याप्रमाणें "Hastily improvised constitution in a rapidly changing situation would have ultimately caused greater trouble and cost."

आर्थिक बाबतींत या मानानें घटना पुरोगामी नाहीं ही गोष्ट खरी आहे. ती समाजसत्तावादी अर्थव्यवस्था प्रस्थापित करणारी नाहीं; पण त्या बाजूला तिचा कल झुकलेला आहे (कलम ३९ पहा), संपूर्ण समाजसत्तावादी अर्थव्यवस्था एकदम प्रस्थापित करण्यास आज देशांतील लोकमत अनुकूल नाहीं. इंग्लंडमध्यें सुद्धां तो कार्यक्रम उघडपणें लढविणारा मजूर-पक्ष प्रौढमतदानानंतर १७ वर्षेंपर्यंत अधिकारारूढ होऊं शकला नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. शिवाय, ज्या विलक्षण आर्थिक संकटांत आपण सांपडलों आहोंत त्यामध्यें संपूर्ण समाजवादी कार्यक्रम एकदम अंमलांत आणण्याचा प्रयत्न भयावह आहे. या दोन्ही अडचणींचें निराकरण झाल्यास समाजसत्तावादाकडे झपाट्यानें प्रगति करण्याच्या मार्गांत घटनात्मक अडचण निर्माण होणार नाहीं हें निश्चित.

## आपली लोकसभा सार्वभौम आहे

घटना संपूर्ण लोकशाही स्वरूपाची आहे असें वर म्हटलें आहे; परंतु घटनेचे कांहीं टीकाकार तिच्यांतील आणीबाणीच्या काळाच्या तरतुदी व अध्यक्षांच्या नांवानें असलेले कित्येक अधिकार

यांचा आधार घेऊन घटना हुकूमशाही ( Dictatorial ) किंवा फॅसिस्ट पद्धतीची आहे असा आरोप करतात. वर लिहिल्याप्रमाणें ध्येयवादानें घटना जरी उजळलेली असली तरी तिचा कांहीं भाग काळवंडलेला आहे हें खरें आहे. आणि त्याचें कारण म्हणजे ज्या उत्पाती आणि आर्थिक संकटाच्या काळांत ती जन्माला आली, त्या काळाची तिच्यावर पडलेली छाया ही होय. मसुदासमितीनें मागाहून मागाहून म्हणजे अखेरच्या तिसऱ्या वाचनाच्या वेळीं सुद्धां ज्या उपसूचना आणल्या, त्यावरून राज्यकारभाराच्या तीन वर्षांच्या अनुभवामुळें नवजात स्वातंत्र्याच्या स्थैर्याची नेत्यांना वाटणारी काळजी ही स्पष्ट दिसत होती. त्यामुळें आणीबाणीच्या व इतर कांहीं तरतुदी आल्या. परंतु त्या कारणानें घटनेचें लोकशाही स्वरूप लोपून ती हुकूमशाही अगर फॅसिस्ट स्वरूपाची झाली आहे, असें मात्र मुळींच म्हणतां येणार नाहीं. आपली मध्यवर्ती लोकसभा ही इंग्लंडच्या 'हाऊस ऑफ कॉमन्स'सारखी सार्वभौम नाहीं; कारण संघस्वरूपाच्या राज्यघटनेंत घटक आणि मध्यसत्ता यांच्यांत सार्वभौमत्व विभागलेलें असतें. मूलभूत हक्क आणि घटकांचें लहानसें पण स्वतंत्र कार्यक्षेत्र यांमुळें आपल्या लोकसभेच्या सार्वभौमत्वाला थोड्याश्या मर्यादा पडलेल्या आहेत. पण त्या मर्यादा अर्थातच फॅसिस्ट किंवा अरेरावी स्वरूपाच्या नाहींत; लोकशाहीशीं विसंगत अशा त्या मर्यादा नाहींत. सबब त्या मर्यादा जमेस धरूनही लोकसभा सार्वभौम आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. आणि घटनेप्रमाणें अशी ही सार्वभौम व आम जनतेची प्रतिनिधि असलेली लोकसभा आणीबाणीच्या काळांत सुद्धां लोप पावत नाहीं व त्या काळांतहि तिचीच सत्ता अखेरची हुकमत चालविते ! हें तर फॅसिझम किंवा अरेरावीपणा याच्या अगदीं विरुद्ध आहे. मग आणीबाणीच्या तरतुदींमुळें घटना फॅसिस्ट किंवा अरेरावी स्वरूपाची झाली असें कसें म्हणतां येईल ? आणीबाणीच्या काळांत प्रांतिक कायदेमंडळाचा लोप होऊं शकतो. पण तीं प्रांतिक कायदेमंडळें अधिक व्यापक मताधिकारानें निवडून आलीं असतीं तर कमी प्रातिनिधिक अशा मध्यवर्ती लोकसत्तेनें हुकमत चालविण्यात लोकशाहीला गालबोट लागतें असें म्हणतां आलें असतें. पण तसेंहि नाहीं. मध्यवर्ती लोकसभा ही प्रांतिक कायदे मंडळाप्रमाणेंच प्रौढमताधिकारानें निवडून येते. सबब, आणीबाणीच्या काळांतहि आपली लोकशाही कायम राहते हा सिद्धांत शाबीत होतो.

## अध्यक्ष हा हुकूमशहा नव्हे !

अध्यक्षांच्या नांवें घटनेंत कित्येक अधिकार नमूद केले आहेत व त्यावरून घटना हुकूमशाही आहे असें म्हटलें जातें. परंतु ते अधिकार त्यांचे एकट्याचेच नाहींत किंबहुना ते त्यांचे नाहींतच. ते वास्तविक मंत्रिमंडळाचे अधिकार आहेत; कारण मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानेंच ते वापरावयाचे आहेत. सत्ताधारी प्रमुख नव्हे, केवळ नामधारी, असें जें इंग्लंडच्या घटनेंत राजाचें स्थान आहे, तेंच स्थान आपल्या घटनेंत अध्यक्षांचें आहे. परंतु घटनेंत तसें स्पष्ट न म्हणतां संकेतावर ती गोष्ट अवलंबून ठेविली ही माझ्या मतें मसुदासमितीची draftingची चूक झाली. Drafting च्या बाबतींत मसुदासमितीवर बरीच टीका झाली. परंतु मी तिच्याशीं सर्वस्वीं सहमत नाहीं. शाब्दिक किंवा भाषाविषयक सुधारणा होऊं शकली असती पण त्या बाबीकडे लक्ष देण्यास मसुदासमितीला वेळच मिळाला नाहीं. मसुदासमितीनें घटनेंत 'वाकिलांकरतां नंदनवन' निर्माण केलें आहे, अशीहि वारंवार टीका करण्यांत आली; पण तीहि बरोबर नाहीं. कारण हें कांहीं केवळ आपल्याच घटनेचें लक्षण नाहीं. आधुनिक मानवी व्यवहार इतका गुंतागुंतीचा झाला आहे कीं कोणतीहि आधुनिक घटना किंबहुना कोणताहि कायदा गुंतागुंतीचा होणें अपरिहार्य आहे. आणि त्यामुळें मी आपल्या भाषणांत म्हटल्याप्रमाणें "The ingenuity of the lawyer will always outpace the assiduity of the draftsman"

माझे Drafting संबंधाचे आक्षेप निराळेच आहेत. एक तर ठिकाठिकाणीं ओघानें येणाऱ्या, तत्सम, अगर हेतू अधिक स्पष्ट करणाऱ्या उपसूचना

स्वीकारल्या नाहींत. उदाहरणार्थ, ३५७ व्या कलमांत (मूळचीं कलमें निराळीं होतीं पण सामान्य वाचकाला तीं लवकर उपलब्ध होणार नाहींत म्हणून तीं दिलीं नाहींत) आणीबाणीचा जाहीरनामा पार्लमेंटची बैठक न भरवितांहि ६ महिनेपर्यंत अंमलांत राहील अशी तरतूद होती. ही मुदत कमी म्हणजे २ महिने करावी अशी मीं उपसूचना दिली व ती स्वीकारण्यांत आली. त्याप्रमाणें आणीबाणीचें दुसरें एक कलम ३५२ यांतहि तसाच फरक करण्यांत आला. परंतु याच प्रकरणांतील तितकींच महत्त्वाचीं, आर्थिक तरतुदी आणि मूलभूत हक्क स्थगित करणारीं कलमें ३५४ आणि ३५९ यांत मात्र "दोन महिन्यांत" अशा उपसूचना दिल्या असतांहि त्या नाकारून "शक्य तितक्या लवकर" हे हुकूम पार्लमेंटपुढें ठेवावे अशी शब्दयोजना करण्यांत आली! दुसरा आक्षेप असा कीं साधारणतः जुन्या शब्दप्रयोगांना अंधपणें चिकटून राहण्याची प्रवृत्ति असतांना "प्रांता"-ऐवजीं "संस्थान" असें नाव उगाचच बदललें. आणि तिसरा आक्षेप वर नमूद केलेला. आपली घटना फार विस्तृत व तपशीलवार आहे हें एक तिचें वैशिष्ट्य आहे. दुसऱ्या कोणत्याहि घटनेचें पुस्तक एवढें जाडजूड नाहीं! असें असूनहि महत्त्वाच्या कांहीं बाबतींत मात्र स्पष्ट तरतूद न करता संकेतावर त्या अवलंबून ठेविल्या आहेत. कॅनडा, ऑस्ट्रेलिया यांच्या घटनांत मंत्रिमंडळ हें कायदेमंडळाला जबाबदार राहील अशी तरतूद नाहीं. तेथें ती गोष्ट संकेतावरच अवलंबून आहे. पण आयर्लंडच्या घटनेंत तशी व्यवस्था आहे व ती आपण उचलली. असें असूनहि आयर्लंडच्या घटनेंत अध्यक्षानें नेहमीं मंत्रिमंडळाच्या सल्ल्या-प्रमाणेंच चाललें पाहिजे अशी जी दुसरी तरतूद आहे ती मात्र मसुदा-समितीनें स्वीकारली नाहीं आणि अशा रीतीनें अध्यक्ष हा हुकूमशहा आहे या गैरसमजाला विनाकारण जागा दिली! पण कांहीं झालें तरी तो निव्वळ गैरसमजच आहे आणि त्यामुळें घटनेचें खरें स्वरूप बदलत नाहीं. नाहींतरी कोणत्याहि घटनेचें खरें स्वरूप ती नुसती पुस्तकांत वाचून कळणार नाहीं. संकेत व परंपरा यांच्या अनुरोधानें ती प्रत्यक्ष कशी राबविली जाते हें पाहिलें पाहिजे. कॅनडा–ऑस्ट्रेलियांच्या घटनांत गव्हर्नरजनरलला पुष्कळ अधिकार आहेत परंतु प्रत्यक्ष ते कधींच बजावले गेले नाहींत. रशियांच्या घटनेंतील कलमाप्रमाणें घटकांना परराष्ट्रांशीं स्वतंत्र करार करणें अगर स्वतंत्र संबंध ठेवणें याची परवानगी आहे; पण इतक्या अत्यंत महत्त्वाच्या बाबतींत प्रत्यक्षांत तसें चालूं देणें शक्य आहे असें मला वाटत नाहीं. लोकशाहीची खरी शक्ति जनतेच्या आणि तिच्या प्रतिनिधींच्या कणखरपणांत आहे; केवळ घटनेंत नाहीं. प्रतिनिधी कणखर असले तर संकेत पाळले जातीलच. ते तसे नसले तर स्पष्ट तरतूदहि उपयोगी पडत नाहीं. पहिल्या महायुद्धानंतर जर्मनींत स्थापन झालेल्या प्रजासत्ताक राज्याची 'वायमर घटना' ही एका प्रोफेसरानें केलेली नमुनेदार ध्येयवादी लोकशाही घटना असें समजलें जात होतें. पण हिटलरनें लवकरच तिच्यांतूनच आपली हुकूमशाही निर्माण केली आणि जगड्व्याळ महायुद्धाचा वणवा पेटविला!

### अटकेसंबंधींचें कलम

घटनेंतील मूलभूत हक्क एका हातानें दिले व अपवादांच्या रूपानें दुसऱ्या हातानें काढून घेतले अशा स्वरूपाचे व म्हणून पोकळ व फसवे आहेत व घटनासमितीच्या प्रतिगामीपणामुळें हें झालें आहे असा एक आक्षेप आहे. कांहीं मूलभूत हक्कांच्या रचनेसंबंधीं माझे स्वतःचेहि मतभेद आहेत; पण वरील मत मात्र मान्य करण्यास मी मुळींच तयार नाहीं. मूलभूत हक्कांचा उल्लेख पुष्कळ घटनांत आहे. त्यापैकीं तुलनेनें कांहीं बाबतींत आपली तरतूद फक्त अमेरिकन घटनेपेक्षां मागासलेली ठरेल. मी एकच महत्त्वाचें उदाहरण घेतों आणि तें म्हणजे अटकेसंबंधींचें आपल्या घटनेंतील कलम २१, ज्यावर खूप टीका झाली आहे. पण अमेरिके-खेरिज इतर घटनांशीं तुलना केल्यास त्यांमधील योजना आपल्यापेक्षां सरस आहे असें म्हणतां येणार नाहीं. आयर्लंडच्या घटनेंत save in accordance with law म्हणजे "कायद्यानें ठरविलें त्याखेरीज इतर रीतीनें" कोणाला अटक





अनुक्रमणिका

करतां येणार नाही. ही तरतूद अगदीं आपल्या तरतुदीप्रमाणें आहे. जर्मनीची ' वायमर घटना ' आणि डॅंझिग शहराची घटना यांत याच अर्थाचे " " save by virtue of law असे शब्द आहेत. रशियन तरतूद तर आपल्या मानानें प्रतिगामी ठरेल; कारण तिच्यांत except by decision of the court or with the sanction of the procurator अशी योजना आहे. वरील सर्व योजनांत विनाचौकशी अटकेचा कायदा करून त्याप्रमाणें अटक करण्यास प्रतिबंध होत नाहीं. पण रशियन घटनेंत तर त्यापलीकडे जाऊन विनाचौकशी अटकेला मंजुरी देण्याचा हक्क एका अधिकाऱ्याला देण्यांत आला आहे! आमच्या घटनेंतील कलम २२ मुळें कायदेमंडळाच्या या बाबतींत कायदा करण्याच्या अधिकाराला थोड्याशा तरी मर्यादा पडल्या आहेत. आयरिश घटना इंग्लंडशीं कडवेपणानें झुंज करणाऱ्या बंडखोरांनीं केलेली आहे. डॅंझिग घटना वुड्रो विल्सनच्या ध्येयवादांतून जन्म पावलेल्या ' लीग ऑफ नेशन्स'नें मंजूर केलेली आहे. वायमर घटनाहि एका ध्येयवादी प्रोफेसरानें तयार केलेली आहे. रशियाबद्दल तर कांहींच बोलावयास नको. हे सर्व प्रतिगामी असतील तर मग आमची घटनासमितीही प्रतिगामी ठरेल!

अमेरिकेच्या तुलनेनें आमच्या घटनेंतील भाषणस्वातंत्र्याच्या अपवादावरहि खूप टीका झाली आहे. पण अमेरिकन घटनेंत हे अपवाद नमूद केले नसले तरी व्यवहारांत ते सर्व अंमलांत आहेत. ते मागाहून श्रेष्ठ न्यायालयाच्या निवाड्यांनीं अस्तित्वांत आले आहेत, एवढाच फरक. अमेरिकेच्या अनुभवाचा फायदा घेऊन पुनः पुनः उगीचच कोर्टाकडे जाणें जरूर पडूं नये म्हणून घटनेंतच ते सामील केले आहेत.

## मध्यवर्ती सत्ता खंबीर असणें इष्ट आहे

स्थलाभावीं आणखी एकाच मुद्द्याचा थोडक्यांत विचार करूं. घटनेंत सत्तेचें फार केंद्रीकरण झालें असून घटक हे निव्वळ म्युनिसिपालिट्यांच्या दर्जाला आणून ठेविले आहेत असा आक्षेप आहे. हा विषय गुंतागुंतीचा असून त्यांत मतभेदाच्या बऱ्याच छटा आहेत. सबब त्यावर ठाम मत देणें कठीण आहे. १९३५ च्या ' गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टा 'पेक्षां सत्तेचें केंद्रीकरण जास्त झालें आहे हें खरें आहे. त्यापुढील विधान मात्र अतिशयोक्तीचें आहे. परंतु खरा वादाचा प्रश्न झालेलें केंद्रीकरण इष्ट का अनिष्ट हा आहे. प्रत्येक खंड स्वयंपूर्ण करावें या टोंकापासून, प्रांतिक कायदेमंडळें वगैरे सर्व गुंडाळून ठेवून दिल्लीहून सर्व कारभार चालविणारें एकावयवी ( unitary ) राज्य स्थापावें या दुसऱ्या टोंकापर्यंत, मतवैचित्र्याच्या छटा आहेत. भारतासारख्या खंडप्राय देशांत हीं दोन्हीं टोकें अशक्य. यांच्या दरम्यानच घटना असणार. फेडरेशन हें एकच नांव दिलें तरी प्रत्येक फेडरेशनमध्यें सत्तेच्या वांटणींत फरक आहे. एकांत एखादी गोष्ट जास्त आहे तरी दुसरी कमी आहे. कॅनडांत प्रांतांना आपली घटना करण्याचा, ती बदलण्याचा ( लेफ्टनंट गव्हर्नरची जागा रद्द करण्याखेरीज ) हक्क आहे तर आपल्या घटकांना तो अधिकार नाहीं. परंतु कॅनडामध्यें मध्यवर्ती सरकारला प्रांतिक कायदेमंडळाचा कोणताहि कायदा नामंजूर करण्याचा अधिकार आहे तसा आपल्या घटनेंत नाहीं. या कारणानें कॅनडाची घटना फेडरल म्हणणें कितपत रास्त आहे याची मला शंका आहे. कारण माझ्या मतें खऱ्या फेडरेशनमध्यें सार्वभौमत्वाची वांटणी झाली पाहिजे; अगदीं लहान क्षेत्रांत का होईना, घटकांना स्वतंत्र अधिकार असले पाहिजेत. परंतु कॅनडांतील मध्यसरकारच्या वरील हक्कांमुळें प्रांत त्याचे अंकित होतात. त्यांना सार्वभौमत्व राहिलें कोठें? आपणाकडेहि बव्हंशीं हाच प्रकार आहे. घटकांच्या दर्जांत आणि अधिकारांत विषमता हें आपल्या घटनेचें एक वैशिष्ट्य आहे. (१) प्रांत, (२) देशी संस्थानें, (३) कमिशनरचे प्रांत व (४) अंदमान आणि निकोबार बेटें—असे ४ प्रकारचे घटक आहेत. यापैकीं ३ व ४ यांत लोकनियुक्त कायदेमंडळें, मंत्रिमंडळें वगैरे कांहीं नसून ते उघड उघड मध्यसत्तेचे अंकित आहेत. देशी संस्थानांना १० वर्षेपर्यंत तरी कलम ३७१ नें याप्रमाणेंच अंकित केलें आहे. राहता राहिला प्रश्न प्रांतांचा. माझ्या मतें प्रांतहि मध्यवर्ती सत्तेला अंकितच आहेत. माझी त्याबद्दल तक्रार नाहीं.








मध्यवर्ती सत्ता बळकट करण्याकडेच सध्यां काळाचा ओघ आहे. आणि भारताच्या परिस्थितींत तर मध्यवर्ती सत्ता खंबीर असणें इष्ट आहे, असें माझें मत आहे. सर्वत्र एकाच म्हणजे कॉंग्रेसपक्षाचीं सरकारें असूनहि अन्नप्रश्नाच्या व आर्थिक उपाययोजनांच्या बाबतींत प्रांताप्रांताचीं निराळीं धोरणें व त्यामुळें निर्माण झालेली विकट परिस्थिति पाहिली म्हणजे मध्यसत्ता खंबीर करण्याची आवश्यकता पटते. वैयक्तिक अपवाद सोडले, तर साधारणतः मध्यवर्ती मंडळाचा अनुभव, कर्तबगारी आणि कार्यक्षमता हीं घटकांच्या मंत्रिमंडळापेक्षां वरच्या दर्जाची राहणार. सबब एकसूत्रीपणाच्या दृष्टीनें त्यांचे हात बळकट करणेंच इष्ट आहे.

याचा अर्थ मध्यसरकारनें पुष्कळशीं कामें आपल्या अंगावर घ्यावीं असा नाहीं. पण अखेरची हुकमत त्याच्याकडे असावी. सबब प्रांत अंकित झाले याबद्दल माझी तक्रार नाहीं. माझी तक्रार अशी कीं घटनेंत ती हुकमत कलम ३७१ प्रमाणें उघड प्रामाणिकपणें न देतां, आडवळणानें मध्य-सत्तेला दिली आहे. आणीबाणीची वेळ तर सोडून द्या. सामान्य वेळीं सुद्धां घटकांच्या संमतीशिवाय त्यांच्या प्रदेशाची पुनर्रचना करणें (कलम ३) किंवा त्यांची प्रत्यक्ष संमति न घेतां त्यांचें कार्यक्षेत्र कमी करणें (कलम २४९) इत्यादी अंकितत्वाचीं अनेक लक्षणें घटनेंत आहेत. त्याहि पेक्षां आक्षेपार्ह लक्षण म्हणजे प्रांतांचें आर्थिक परावलंबित्व अधिकच वाढविलें आहे. एक स्वतंत्र कार्यक्षेत्र दिलें परंतु मध्यसत्तेच्या आर्थिक मदतीशिवाय जर त्या जबाब-दाऱ्या पार पाडतां येत नसल्या, तर त्या स्वातंत्र्यांत अर्थ काय ?

## 'समन्वयवादी' घटना

सारांश, माझ्या मतें सत्तेचें केंद्रीकरण झालें तें कांहीं गैर नाहीं. परंतु तें उघडपणें झालें असतें तर बरें होतें. मध्यवर्ती सत्तेचें कार्यक्षेत्र नवीन घटनेंत वाढविलें असलें तरी प्रांत व संस्थानें यांकडे अद्यापि बरेंच विस्तृत क्षेत्र आहे. या बाबतींत अमेरिका, ऑस्ट्रेलिया वगैरेशीं तुलना करतां येत नाहीं. कारण त्यांत मध्यवर्ती सत्तेला कांहीं निश्चित अधिकार दिले असून शेषाधिकार घटकांना आहेत. तुलना करावयाची तर दक्षिण आफ्रिका, कॅनडा यांच्याशीं करतां येईल. द० आफ्रिकेंत घटकांचें कार्यक्षेत्र म्युनिसिपालिट्यांपेक्षां फारसें उच्च नाहीं. (ती संघराज्याची घटना नाहींच म्हटलें तरी चालेल.) कॅनडांत त्यापेक्षां विस्तृत आहे. पण आपलें त्याहीपेक्षां कार्यक्षेत्र विस्तृत आहे. सबब आपल्या प्रांतांना म्युनिसिपालिट्या बनविलें हें म्हणणें अतिशयोक्तिचें आहे. प्रांतांसह सर्व घटक दुय्यम दर्जाचे असतां, रूढ अर्थाविरुद्ध सार्वभौमत्वाचें निदर्शक असें "संस्थान" (State) नांव त्यांना उगीचच दिलें आहे. कमिशनरचे प्रांत व अंदमान—निकोबार बेटें यांच्या बाबतींत तर तें हास्यास्पद दिसतें ! विषमता लपविण्याकरतां एकच नांवें दिलें म्हणावें तर विषमता लपली नाहींच, पण 'अ' भागांतील संस्थान, 'ब' भागांतील संस्थान असा बोजडपणा मात्र आला आहे ! असो. आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून घटनेवरील प्रतिगामित्वाचे वगैरे आरोप निराधार आहेत असें वाचकांना पटेल अशी मी आशा करतों. एकंदरींत घटना "समन्वयवादी आहे. ती स्थैर्य देणारी आहे पण प्रगमनशीलहि आहे; तिच्यांत व्यक्तिविकासाला महत्त्व आहे. पण सामुदायिक हितबुद्धीबद्दलहि जागरूकता आहे." पण बोलून चालून तें साधन आहे. आणि साधनाची यशस्विता हें करणाऱ्याच्या कौशल्यापेक्षांहि तें वापरणाऱ्याच्या वृत्तीवर आणि शक्तीवर विशेष अवलंबून असतें. त्या दृष्टीनें कित्येकांच्या मनांत प्रौढमताधिकाराच्या तरतुदी-बद्दल शंकाकुशंका येतात. पण आपण आपल्या तत्त्वावर अढळ निष्ठा ठेवून सामान्यतः सामान्य माणसाची व्यवहारबुद्धि विजयी होईल अशी आशा बाळगूं या. माझ्या मतें घटनेच्या खऱ्या कसोटीची वेळ प्रारंभीच्या पांच वर्षांत येईल. दरिद्र-नारायणाचे प्रतिनिधी म्हणून निवडून येणारीं सरकारें त्या अवधींत जर त्याच्या आशा अंशतः सफळ करूं शकलीं, त्याचें जीवन थोडेसें तरी सुसह्य करूं शकलीं, तर घटना यशस्वी झाली असें म्हणतां येईल. तसें झालें तर घटनासमितींतील माझ्यासारख्या सभासदास आपल्या श्रमांचें चीज झालें असें अभिमानपूर्वक वाटेल !





अनुक्रमणिका

श्री. दि. के. बेडेकर

# विरोधविकास नव्हे, द्वंद्वात्मक स्वयंगति

हेगेल व मार्क्स यांचा 'डायलेक्टिक्स' नांवाचा सिद्धान्त आतां मराठी वाचकांच्या परिचयाचा होत आहे. सन १९४० मध्येंच श्री. पां. वा. गाडगीळ यांनीं "मार्क्संचा भौतिकवाद' या पुस्तकांत त्याची विस्तृत मांडणी केली. फुटकळ लिखाणांतून कम्युनिस्ट, समाजवादी, रॉयवादी व श्री. जावडेकरांसारखे गांधीवादीहि या सिद्धान्ताचा उल्लेख सन १९३२ पासून करीत आलेले आहेत.

मराठींमध्यें 'डायलेक्टिक्स' याचें भाषांतर '**विरोध-विकास**' असें आतां रूढ होत आलें आहे.

या पारिभाषिक संज्ञेच्या चर्चेंतून योग्य परिभाषेकडे व मूळ सिद्धान्ताच्या आकलनाकडेहि बरेचसें जातां येईल या कल्पनेनें प्रस्तुत विवेचन मी करीत आहे.

## 'विकास' नव्हे, बदल

हेगेलच्या व पर्यायानें मार्क्सच्या या सिद्धान्ताचें मर्मच 'विकास' या शब्दामुळें कळेनासें होतें हा माझा पहिला आक्षेप आहे. 'विकास' किंवा 'प्रगति' या कल्पना मानवी मूल्यमापनाच्या क्षेत्रांतील आहेत. 'न्याय', 'सत्य', 'सौंदर्य' या कल्पनांप्रमाणें 'विकास' ही एक मानवसापेक्ष बाब आहे. मानवसमाजाचाच मर्यादित विचार करतांना या साध्यांचा व कल्पनांचा विचार ठीक आहे. पण 'डायलेक्टिक' हा असा सिद्धान्त नाहीं. तें एक विश्वासंबंधींचें विचारसूत्र आहे.

मग 'डायलेक्टिक'चा अर्थ काय? तर तो विश्वांतील वस्तुजाताच्या स्थितिगतीचा एक नियम आहे. विश्वांतील प्रत्येक वस्तूला जन्म, स्थिति व अंत आहे. या वस्तुस्थितीचा विचार ही या सिद्धान्ताची भूमि आहे. या भूमीवर स्थिर उमें राहून मग हेगेल असें विचारतो कीं, वस्तूंच्या या जन्मस्थितिलयाचें कांहीं शास्त्र, एकादा सामान्य नियम आहे का? तो उत्तरहि देतो कीं, या घडामोडीचा किंवा बदलाचा सर्वंकष नियम आहे. त्याचें नांव 'डायलेक्टिक्स.'

'डायलेक्टिक्स' हें विश्वाच्या गतीचें सूत्र आहे व वस्तुजाताच्या 'जीवनयात्रे' (mode of existence)चें स्वरूपवर्णन आहे.

## गति नव्हे, स्वयंगति

'विकास' या मर्यादित अर्थाच्या शब्दापासून सुटका करून घेतली व 'गति' ही व्यापक संज्ञा स्वीकारली म्हणजे पुढचें पाऊल सोपें होतें. पण नुसता गति हा शब्द पुनः घोटाळ्यांत पाडणारा आहेच. आगगाडीची 'गति' ही नुसती स्थानांतराची गति आहे. चाकाची गति ही देखील भ्रमणगति आहे, म्हणजे स्थानांतराचीच गति आहे. विश्वांतील सर्व वस्तुजाताची गति ही अर्थातच केवळ स्थानांतर-गति नसून अनेकविध आहे. स्थान, आकार, वेग, रचना, इत्यादि अनेकविध बाबतींत जे बदल होतात त्या सर्वांना मिळून 'गति' ही व्यापक संज्ञा समजली पाहिजे.

अशा व्यापक अर्थानें 'गति' हा शब्द घेऊन 'डायलेक्टिक्स्'चा अर्थ लावला पाहिजे. तो अर्थ काय? तर '**डायलेक्टिक्स्**' ही '**स्वयंगति**' आहे.

एखाद्या वस्तूला बाहेरील धक्क्यानें किंवा अनुप्रविष्ट अशा एखाद्या प्रेरक शक्तीनें 'गति' मिळणें,ही विचाराची एक दिशा झाली. उदाहरणार्थ, याच पद्धतीनें विचार करून विश्वाची उपपत्ति ईश्वरवादी लावतात. ते म्हणतात कीं, साऱ्या वस्तु-जातांच्या अंतर्यामांत ईश्वर, किंवा एक ईश्वरी तत्त्व अनुप्रवेश करून व्यापून राहिलें आहे; तेंच सर्व वस्तूंच्या उत्पत्ति–स्थिति–लय या रहाटींचें कारण व प्रेरणा आहे; मनुष्य देखील जें स्वेच्छेनें म्हणून करतो तें ईश्वराचें अनाकलनीय उद्दिष्ट पार पाडण्यासाठीं, निमित्तमात्र होऊन करीत असतो; समाजाचा विकास होतो महापुरुषांच्या विभूति-मत्त्वामुळें होतो; व हे महापुरुष ईश्वरांश, ईश्वरावतार किंवा ईश्वराचे प्रेषित असतात.

प्राचीनतम अशा भारतीय व इतर विचार-विश्वांत 'कर्म' ही सर्वगामी प्रेरक-शक्ति ईश्वराच्या ऐवजीं मानली गेली होती. त्रिगुणात्मक प्रकृति किंवा माया हीच विश्वगतीची जननी व धात्री असून ती अनादि मानली गेली होती. या मायेची किंवा कर्माची गहन प्रेरणा व सृजनशक्ति ही फक्त जड वस्तुजाताचीच नव्हे, तर प्राणिमात्राच्या जीवन-यात्रेची नियंत्रक शक्ति मानली गेली होती. जन्म-सिद्ध जातिव्यवस्था, राजधर्म इत्यादी सामाजिक बाबी गुण (म्हणजे प्रकृतीचे त्रिगुण) व कर्म यांनीं ठरतात, असें त्या समाजांत मानलें जाई.

यावरून असें दिसेल कीं, जडसृष्टि व मानवसृष्टि यांच्या गतीचें कारण बाह्य मानणें ही प्राचीन कर्मवादाची व नंतरच्या ईश्वरवादाची परंपरा आहे. याच परंपरेच्या छायेंत आधुनिक ख्रिस्ती युरोपचें हेगेल-पूर्व तत्त्वज्ञान वाढलें. जड-वस्तुवाद ( French materialism ) व मनश्चैतन्यवाद ( Berkeley-an Idealism ) हीं अठराव्या शतकांतील परस्पर-विरोधी दर्शनें घेतलीं तर या दोघांनाहि या परंपरेंतून खरी सुटका करून घेतां आली नाहीं. ती सुटका प्रथम हेगेलनें केली व बाह्य शक्ति न मानतां सृष्टीची गति कशी उमगतां येते, हें त्यानें प्रथम दाखवलें.

हेगेलनें प्रतिपादन केलें कीं, सृष्टीची गति ही स्वयंगति ( self-movement ) आहे. ती बाहेरच्या धक्क्यानें पैदा होत नाहीं, तर तिचा उगम अंतर्यामीं स्वयंसिद्ध व स्व-गत असा आहे.

### स्वयंगतीचा उगम द्वंद्वांत

हेगेलच्या तत्त्वज्ञानानें युरोपीय विचारविश्वांत क्रांति केली. तो तत्त्वज्ञानांतील युगपुरुष ठरला. हा मान त्याला मिळण्याचें एकमेव कारण असें कीं, विश्वगतीला स्वयंगतीचें स्वरूप आहे व तें कसें आहे तें त्यानें दाखवून दिलें.

स्वयंगतीचा उगम कोठें आहे ? हा मोठा गूढच प्रश्न होता. पण हेगेलचें उत्तर मात्र अगदीं सोपें होतें. तो म्हणाला कीं, प्रत्येक वस्तू ही गतिशील आहे व तिच्या गतीची किल्ली तिच्याच-जवळ आहे. इकडे तिकडे बाहेर ती कळ शोधणें चूक आहे. वस्तूच्या अंतर्यामांतच गतीची कळ आहे म्हणावें, तर वस्तूचें अंतरंगच एकजिनसी, स्थिर व बिनगुंतागुंतीचें मानतां येणार नाहीं. तें तसें नसतें का ? हेगेल म्हणतो कीं नसतें. उलट तो बजावतो कीं, निरवयव, एकरूप, अच्छेद्य व शेवटीं निर्गुण अशा वस्तूची कल्पना दैवतासारखी स्थापून तिचें ध्यान करीत बसल्यामुळेंच तत्त्वज्ञानाची सारी साधना कुंठित झाली.

मग वस्तूचें **खरें स्व–रूप** काय ? तर तें **द्वंद्वात्मक** आहे, ही 'डायलेक्टिक्स'ची मुख्य शिकवण आहे.

प्रत्येक वस्तूमध्यें अनेकविध गुण व घटक असतात व त्यांतले कांहीं एकमेकांना विरोधी असतात, कांहीं पोषक असतात. उदाहरण घ्यायचें तर आजचा मानवसमाज. या वस्तूमध्यें अनेक तऱ्हेचे विरोध व संघर्ष आहेत आणि तेवढेच स्नेह व तडजोडी आहेत. मग विरोधी गुणांच्या सर्वच जोड्या घेऊन त्यांचीं तेवढीं द्वंद्वें प्रत्येक वस्तूंत मानावयाचीं काय ?

वरील सर्व शंका उद्भवतात हें सहज आहे. विरोध व द्वंद्व यांतला फरक नीट ध्यानांत घेतला तर मात्र या शंका उरत नाहींत.

### बीजघटकांचें द्वंद्व

'द्वंद्व' हा शब्द मोठा अर्थवाहक आहे. द्वंद्व ह्मणजे नुसतें द्वैत नव्हे किंवा विरोधी वस्तूंची टक्कर नव्हे.








# विरोधविकास नव्हे, द्वंद्वात्मक स्वयंगति

साठमारी करणाऱ्या दोन हत्तींना विरोधी म्हणतां येईल; कारण त्या दोघांचें वेगवेगळें वस्तूपण आणि अस्तित्व आहे. त्या साठमारीवरच अवलंबून असें कांहीं नाहीं. द्वंद्वाचें तसें नाहीं, कारण तें एका वस्तूंत असतें.

विरोधी पण एका वस्तूमधील विरोधी गुणांच्या सर्व जोड्याही द्वंद्वें नव्हेत. उलट त्या वस्तूच्या अवस्थेलाच द्वंद्व म्हणतात. द्वंद्व हें वस्तूचेंच रूप आहे. हें द्वंद्व मग कोणांत चालतें? तर अशा दोन बीज-घटकांत कीं ज्या घटकांच्या द्वंद्वावरच त्या वस्तूच्या अस्तित्वाची सर्व मदार आहे. उदाहरणार्थ, विजेच्या प्रवाहांत उष्णता, कांहीं ठिकाणीं प्रकाश इत्यादीं गुण असतात. पण ते विद्युत्प्रवाहाचे बीज-घटक नव्हेत. बीज-घटकांना घन-व-ऋण-विद्युत् म्हणतात. त्यांच्या परस्पर-संबंधाला द्वंद्व म्हटलें कीं झालें.

वस्तूचे हे बीजघटक द्वंद्वाच्या संबंधानें एकसारखे बांधलेले असतात; किंवा असेंहि म्हणतां येईल कीं या बीज-घटकांचा एकमेकांच्या आश्रयाशिवाय व संघर्षाशिवाय वस्तूचा निर्वाह होत नाहीं. यावरून दिसेल कीं विरोध हा दोन व्यवच्छिन्न वस्तूंमधील बाह्य संबंध आहे व तो एकेरी आहे. विरोध हा तेवढ्या साठमारीपुरताच संबंध आहे. द्वंद्व ही मात्र प्रत्येक व एकेक वस्तूमधील अंगभूत अंतर्यामींची प्राणस्थिति आहे व ती दुहेरी प्रक्रिया आहे. द्वंद्वामध्यें बीजघटकांचा परस्पराश्रय व परस्परसंघर्ष एकाच जागीं सांठवलेला आहे. विरोध हा विरोधी भिन्न वस्तूंचें स्वरूप उघड करीत नाहीं. द्वंद्व हेंच वस्तूचें रूप आहे. विरोध हा वस्तूंच्या गतीचा उगम नव्हे, द्वंद्व हें गतीचें एकमेव उगमस्थान आहे.

## अस्तित्वाचें कोडें

'विरोध-विकास' या शब्दावरील आक्षेप व 'द्वंद्वात्मक स्वयंगति' या शब्दांचें समर्थन मी येथवर केलें. तेवढाच या लेखाचा मूळ उद्देश मी ठेवला होता. या स्वयंगतीच्या तत्त्वाची मांडणी हेगेलनें चैतन्यवादी भूमिकेवरून केली आणि मार्क्सनें तीच मांडणी वस्तुवादी[1] भूमिकेवरून केली.

पण या 'स्वयंगति' सिद्धांताची ओळख नीट न राहिल्यामुळें आज बरेच गोंधळ होत आहेत व 'विरोधविकास' या परिभाषेनें तर मराठीमध्यें हे गोंधळ वाढत आहेत. यांचें प्रत्यंतर पहावयाचें तर सप्टेंबर (१९४९)च्या 'नवभारतां'तील दोन लेखांत मिळेल. तें आतां पाहूं.

पहिला लेख म्हणजे ज्यांत हेगेलची अस्तित्वाची कल्पनाच प्रा. वऱ्हाडपांडे[2] यांनीं खोडून काढली आहे. हेगेल एवढेंच म्हणतो कीं, प्रत्येक वस्तु व सारें वस्तुजातच एका विशिष्ट तऱ्हेनें अस्तित्वांत आहे. ती अस्तित्वाची 'पद्धति' अशी कीं, अस्तित्वाबरोबरच, Being बरोबरच अभाव किंवा नाश, not-Being हा छायेसारखा चिकटलेला आहे. प्रा. वऱ्हाडपांडे यांनीं हेगेलला पेंचांत पकडलें आहे. 'बैल गाभणा' म्हटलें तर कोणीहि म्हणेल कीं, 'एक काय ते बोला; बैल म्हणायचें तर गाभणा म्हणूं नका आणि गाभणा म्हणायचें तर बैल म्हणूं नका!'

पण हेगेलला एवढा पोरकट पेंच कळत का नव्हता? तरी तो म्हणाला कीं, अस्तित्व व नाश ही दोन्हीं वस्तूच्या पाचवीला पुजलेलीं असतात. पण त्यानें या कोड्याचा अर्थहि उकलून दाखविला व या उलगड्यांतच सत्तास्वरूपशास्त्रा(metaphysics)चीच नव्हे, साऱ्या तत्त्वचिंतना(philosophy)ची विकासकथाच त्यानें समार मांडून दाखविली.

---

१ सांख्यदर्शनांतील प्रकृति ही जडवस्तु (matter) नाहीं व पंचमहाभूतें हीं वस्तुतत्त्वें (elements) नाहींत. म्हणून materialism या शब्दाचे पर्याय जडवाद, प्रकृतिवाद किंवा भौतिकवाद हे बरोबर नसून, वस्तुवाद हाच प्रतिशब्द योग्य आहे असें मला वाटतें.

२ 'विरोधविकासवादांतील विसंगति', 'नवभारत', सप्टेंबर १९४९.





अनुक्रमणिका

अस्तित्व व नाश यांचें एक द्वंद्वच आहे, आणि अस्तित्व व नाश हे सत्ते-( existence )चे बीज-घटक आहेत, हा हेगेलचा सिद्धान्त आहे. यांतून सहजच त्यानें वस्तूच्या स्वयंगतिशील जीवनयात्रेचा, Becoming चा पर्याय सांगितला. अस्तित्वाचें कोडें त्यानें सोडविलें व अस्तित्वाचा अर्थ ( essence ) स्वयंगतिशील जीवनयात्रेंतच, becoming आहे, हा क्रांतिकारक बजिमंत्र त्यानें तत्त्वज्ञानाला दिला. हें सारें प्रा. वऱ्हाडपांडे यांनी विचारांत घेतलेलें दिसत नाहीं.

## सहकार्याची कल्पना !

दुसरा लेख म्हणजे ज्यांत 'विरोध-विकास'-शब्दावर आधारलेली व ' द्वंद्वात्मक स्वयंगती 'च्या सिद्धान्ताला वस्तुतः डावलून जाणारी एक सहकार्याची कल्पना सेप्टेंबरच्या ' नवभारता 'च्या अंकांतच श्री. प्रेमाबाई कंटक यांनीं मांडली आहे. प्राणिसृष्टींत ( व अर्थातच मानवसृष्टींत ) केवळ संघर्ष, हिंसा व मात्स्यन्याय हाच ' नैसर्गिक नियम ' आहे असें डार्विनच्या नांवावर खपविलेलें एक मत आहे. स्पर्धा व सत्ता हाच भांडवलदारी तत्त्वज्ञानाचा व व्यवहाराचा पाया असल्यानें हें मत धनिकवर्गाला व शेखमहंमदी व्यक्तींना मोठें प्रिय असतें. पण धनिकसंस्कृतीला विटलेल्या मानवधर्मवादी लोकांना हें हिंस्र तत्त्व साहजिकच त्याज्य व आसुरी वाटतें. रस्किन, क्रोपोट्किन, टॉल्स्टॉय प्रभृतींनीं या हिंस्र मतावर साहजिकच खूप कोरडे ओढले आहेत. हे लोकच गांधीजींचे गुरू आहेत.

पण या दयार्द्र मनाच्या विद्वानांनीं दुसरें विरोधी मत म्हणून जो सहकार्याचा पंथ प्रस्तुत केला त्याची गंमत अशी झाली कीं या नव्या 'सहकार्य'–व–'प्रेम' पंथाचा पुनः भांडवलदारांनींच उपयोग करून घेतला. जेवढें मात्स्यन्यायाचें हिंस्र मत त्यांनीं राबविलें, तेवढेंच हें प्रेमाचें कोमल मतहि त्यांनीं जगभर वेठीला धरलें आहे !

असें उफराटें कां झालें ? तर सहकार्य हें स्वतंत्र तत्त्वच नसतां त्याला जीवनधारणेचा आधार बनविण्याचा खटाटोप या पंडितांनीं केला आहे. आपण मूळ विवेचनांत पाहिलेंच आहे कीं, द्वंद्व म्हणजे साठमारी नाहीं. बीजघटकांची जुंपणी परस्पराश्रय व परस्परसंघर्ष या दुहेरी बंधनांनीं झालेली असते; म्हणून तर वस्तू संभवते. नुसता संघर्ष किंवा नुसता आश्रय बीजघटकांमध्यें संभवतच नाहीं. समाजाचेंच उदाहरण घेऊं. समाजाचे बीजघटक म्हणजे आज भांडवलदारवर्ग व कामगारवर्ग यांच्यामध्यें संप व राजकीय लढे या समाजांत चालतात. पण या दोन वर्गांचा एकमेकांवांचून निर्वाह होणेंहि या समाजांत शक्य नाहीं. मार्क्सनें ह्यावर उपाय सांगितला आहे. मार्क्सचा उपाय सोपा आहे व तो संघर्ष व आश्रय या द्वंद्वाचा, म्हणजे भांडवलदारी समाज या वस्तूचाच नाश करण्याचा आहे. हें द्वंद्व गेलें म्हणजे संघर्ष व सहकार्य दोन्ही उरणार नाहींत, वर्गच रहाणार नाहींत. मानवसमाजाच्या अंतर्गत द्वंद्वाचा, वर्गद्वंद्वाचा असा नाश होऊन मानव व निसर्ग हें नवें द्वंद्व व या बीजघटकांचा परस्पराश्रय व संघर्ष पुढील मानवेतिहासाची एकमेव प्रेरणा ठरेल अशी मार्क्सची साध्य-साधना आहे.

या उलट गांधीवाद्यांचें म्हणणें असें कीं, संघर्ष व सहकार्य ह्या आसुरी व दैवी प्रवृत्ती आहेत. त्यांपैकीं सहकार्याचें तत्त्व साध्य व साधना म्हणून आम्ही आध्यात्मिक धारणेमुळें स्वीकारतों आणि मार्क्सवादी हे युरोपीय भोगवादाच्या व जडवादाच्या आहारीं गेलेले असल्यामुळें ते संघर्ष, कलह, रक्तपात यांतच रममाण होतात ! पण भांडवलदारी समाजरूपी जरासंधाच्या शरीराधीलाच सजीव ठेवण्याचा खटाटोप करण्यांत कोणालाच यश येणें अशक्य आहे. नुसत्या ' प्रेम ' व ' सहकार्य ' या अर्धवट तत्त्वांना आजच्या समाजशरीरांत शरीराधाचें स्थान आहे म्हणून त्या तत्त्वांचा घोष शेवटीं, अध्यात्मवाद्यांच्या इच्छेविरुद्ध

३ ' समाजधारणेचा सिद्धांत : विरोध कीं सहयोग ? ', ' नवभारत ', सप्टेंबर १९४९.



अनुक्रमणिका






देखील, भांडवलदार वर्गाच्या उपयोगीं पडतो, आणि त्यांच्या पदरीं मात्र आत्म-पर-वंचना पडते !

## मार्क्सवादांतील पारिभाषिक शब्द

'द्वंद्वात्मक स्वयंगति' ह्यांतील द्वंद्व हा शब्द मूलभूत धरून बंगालीमध्यें मार्क्सच्या दर्शनाला 'द्वंद्वात्मक वस्तुवाद' हा प्रतिशब्द रूढ झाला आहे. त्यांत 'स्वयंगति' ही प्राणभूत कल्पना वगळली जाते. मला वाटतें कीं लांब वर्णनात्मक प्रतिशब्द म्हणून 'द्वंद्वात्मक स्वयंगतिशील वस्तुवाद' असें नांव मार्क्सदर्शनास द्यावें व सुटसुटीत वापरण्यासाठीं नुसतें 'मार्क्सप्रणीत वस्तुवाद' म्हणावें. 'विरोधविकासवाद', 'गत्यात्मकवाद', 'गतिवाद', 'गतितार्किकवाद' (तेलगू), 'परस्परवैरुद्धवाद' (मल्याळी), 'क्षणिकवाद' (राहुलसांकृत्यायन) असे विविध पर्याय मार्क्सप्रणीत वस्तुवादाला वेगवेगळ्या लोकभाषांतून रूढ झाले आहेत. पण अजून एकमत करून मीं सुचविलेला पर्याय सर्वमान्य होणें शक्य व इष्ट आहे.

हीच गोष्ट मार्क्सवादांत येणाऱ्या अनेक पारिभाषिक शब्दांची आहे. उदाहरणार्थ, हेगेलचा प्रसिद्ध त्रिपुटीक्रम घ्या. स्वयंगतीचें तें एक सूत्र आहे. द्वंद्वात्मक असल्यामुळें वस्तूला व तिच्या जीवनयात्रेला 'वादा'ची उपमा हेगेल देतो. पूर्वपक्ष व उत्तरपक्ष होत होत 'वादे वादे तत्त्वबोधः' होतो, असा नित्याचा अनुभवच आहे.

पण स्वयंगतीचा गाभा न समजल्याकारणानें पर्यायशब्द योजतांना कसा गोंधळ होतो पहा. साऱ्या हेगेलवादाला गीताप्रणीत कर्मयोगापासून डार्विनप्रणीत विकासवादापर्यंतचे 'संस्कार' करून एक नवेंच दर्शन श्री. पां. वा. गाडगीळांनीं बनविलेलें आहे ('मार्क्सचा भौतिकवाद' पहा). त्यांना वाटतें कीं, गतीचा उगम वस्तूच्या पोटीं वाढणाऱ्या विरोधामुळें होतो, आतिरेकामुळें स्फोट होतो वगैरे. म्हणजे द्वंद्व हें त्यांच्या दर्शनांत कोठेंच येत नाहीं. मग त्रिपुटीक्रमाचें सूत्रहि बारगळतें व सगळ्या 'विरोधा'चा शेवट त्यांच्या मतें 'संयोगां'त होतो. प्रा. वऱ्हाडपांडे देखील त्रिपुटीक्रमाचा शेवट 'समन्वयांत' करतात !

खरें असें आहे कीं त्रिपुटीक्रम हा 'वाद', 'प्रतिवाद', 'सिद्धान्त' अशा स्वरूपाचा आहे., म्हणजे त्या प्रक्रियेचें फळ हें 'वाद' व 'प्रतिवाद' यांच्यातला 'संयोग' किंवा 'समन्वय' नसून त्या दोघांहून वेगळेंच असतें व तें सिध्दान्तरूपानें 'वाद' व 'प्रतिवाद' या बीजघटकांचा अभिभव किंवा नाशच करतें, समन्वय करीत नाहीं.

'विरोध' आणि 'विकास' या दोन शब्दांनीं हेगेल व मार्क्स यांच्या तत्त्वज्ञानाचें सत्यस्वरूप किती विपरीत दिसतें हें पहावयाचें असेल, तर प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर यांचा[४] 'विरोधविकासवादाचें तर्कट' हा लेखहि वाचण्यासारखा आहे. प्रा. पुणतांबेकर हे मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचे व एकंदरच कम्युनिस्ट ध्येयवादाचे कट्टे विरोधक आहेत. त्यांना 'डायलेक्टिक्स' हें एक भयंकर तर्कट वाटतें ! पण ही गोष्ट जमेस घेतली तरी त्यांच्या लेखांचा नीट विचार केला तर असें दिसून येतें कीं, त्यांनीं घेतलेल्या आक्षेपांचें मूळ 'विरोध' व 'विकास' या दोन मराठी शब्दांमुळें मार्क्सवादासंबंधीं साहजिकच उत्पन्न होणाऱ्या गोंधळांत आहे. समाजाचे किंवा तत्त्वतः प्रत्येकच वस्तूचे 'केवळ दोनच ठोकळ विरोधी भाग बनूं शकत नाहींत, केवळ एकच कल व अवस्था एकाच शुद्ध स्वरूपांत असत नाहीं' हा त्यांचा आक्षेप घ्या. त्याचें मूळ 'विरोध' या एकेरी शब्दांत आहे. त्याऐवजीं 'द्वंद्व' हा घेतला कीं प्रत्येक वस्तूचे 'परस्पराश्रयी आणि परस्परविरोधी' अशा द्वंद्वात्मक बंधनांनीं 'युक्त' (म्हणजे एकजीव जोडलेले) घटक डोळ्यासमोर उभे राहतात. तसाच प्रकार 'विकास' शब्दाचा आहे. 'विकास' हा केवळ क्रांति, मरण, नाश, थोडक्यांत म्हणजे

---

४ 'अखंड भारत', दीपावली अंक, १९४९, पानें १७-१९ पहा.





अनुक्रमणिका

कम्यूनिस्टांच्या माथीं भांडवलदारांनीं मतलबीपणानें लादलेलें विध्वसंक समाजशत्रुत्व आहे, असा मार्क्सचा समाज होता असें प्रा. पुणतांबेकर मानतात; उलट, 'त्यामधील अवस्थांचा म्हणजे स्थितीचा, वाढीचा, प्रक्रियेचा व त्यांतील अनेक रूपांचा विचार' मार्क्सवादविरोधी तत्त्वज्ञ करतात असा स्वमत-प्रतिपादनाचा आग्रह ते धरतात.

खरें असें आहे कीं, समाजाच्या किंवा इतरहि वस्तूंच्या फक्त मरणाची कुंडली मांडीत बसणें हें कोठल्याच तत्त्वज्ञानाचें काम असत नाहीं. 'समाजाचें मरण' ही गोष्ट कोठल्याहि लोकहितवादी तत्त्वज्ञाच्या, म्हणून मार्क्सच्याहि डोळ्यापुढें नव्हती. भांडवलदारी म्हणजे समाज नव्हे तर समाजाची एक अवस्था आहे. तिचें मरण म्हणजे समाजाचें मरण नसून तोच समाजाच्या सर्वनाशाला टाळण्याचा व खऱ्या अर्थी सर्वोदयाचा मार्ग आहे असा मोठा उदार ध्येयवाद व आशावाद मार्क्सचा होता. त्यानें स्थिति, गति, वाढ (म्हणजेच वर्धनगति किंवा evolution) इत्यादी प्रक्रियांचा विचार केलेला आहे. एवढा 'कॅपिटल' ग्रंथाचा प्रपंच त्यानें भांडवलदारीच्या स्थितीचा व वर्धनगतीचा उलगडा करण्यासाठींच केला आहे.

पण, मार्क्सचें (किंबहुना मूळ हेगेलचें) म्हणणें असें कीं प्रत्येक वस्तूची स्थिति व वर्धनगति पहात समाधान मानीत बसणें हें चूक आहे. कारण वस्तूंच्या स्थितीच्या व वर्धनाच्या मार्गेपुढें उत्पत्ति व नाश यांचीं टोंकें आहेतच. उत्पत्ति व नाश हीं हेगेलचीं किंवा मार्क्सचीं आवडतीं कपोलकल्पितें आहेत असें प्रा. पुणतांबेकरही म्हणणार नाहींत. मग या उत्पत्तीची व नाशाची मीमांसा तत्त्वज्ञांनीं करावयाची का नाहीं?

नेमकी हीच मीमांसा म्हणजे वर्धनगतीला सामावणारी परंतु तिच्यापेक्षां व्यापक आणि सत्याला धरून असलेली स्वयंगतीची कल्पना. स्वयंगतीमध्यें वर्धनगति व क्रांति या दोहोंचें स्थान आहे, विचार आहे व त्यांत त्यांची परस्परसापेक्षता नीट समजण्यासारखी मांडली गेली आहे. क्रांति ही कांहीं घटकेघटकेला, केवळ लेनिनसारख्या महापुरुषाच्या प्रतिभेमुळें किंवा अजस्र असंतोषामुळें घडत नाहीं व घडवितां येत नाहीं. वर्धनगतीची शक्यता संपण्याच्या आधीं क्रांति घडवितां येत नाहीं व संपल्यावर ती थोपवितां येत नाहीं असा एक सर्वसाधारण नियम व ह्या नियमाच्या आधारानें क्रांतीची पूर्वतयारी व प्रत्यक्ष क्रिया पार पाडण्याचें समाजांतलि अग्रगामी वर्गाचें कर्तव्य असें मार्क्सनें सांगितलें आहे.

प्रा. पुणतांबेकरांना द्वंद्वाची दुहेरी कल्पना जशी अपरिचित राहिली आहे तशीच क्रांति व वर्धनगति यांची परस्परसापेक्षताहि त्यांच्या नजरेआड राहिली आहे. साहाजिकच, 'क्रांतिमय' (म्हणून हिंसामय, रक्तमय, इत्यादि) विकासवाद तो मार्क्सचा विरोधविकासवाद, असा त्यांचा गैरसमज झाला असून या गैरसमजाचें अंशतः तरी कारण 'विकास' या चुकीच्या पारिभाषिक शब्दांत आहे.

असाच घोंटाळा मार्क्सच्या वस्तुवादी इतिहासदर्शनाच्या बाबतींत रूढ झालेल्या परिभाषेमुळें होत आहे. मार्क्सच्या तत्त्वदर्शनाला 'विरोधविकासी भौतिकवाद' म्हणावयाचें व मानवेतिहासविषयक मताला 'ऐतिहासिक भौतिकवाद' म्हणावयाचें हा मराठींत रूढ प्रकार आहे. इंग्रजींत देखील Historical Materialism हा उफराटा शब्द वापरांत असल्यामुळें व त्याला मराठी पर्याय शोधतांना अर्थाऐवजीं इंग्रजीची बरहुकूम नक्कल केल्यामुळें हा गोंधळ झाला आहे. 'ऐतिहासिक' नव्हे तर 'इतिहासासंबंधीं' मार्क्सनें वस्तुवादी दृष्टीनें जें मत सांगितलें आहे त्याला 'वस्तुवादी इतिहास-दर्शन' (materialist interpretation of history) हा पर्याय किती सरळ आहे!

अशा अनेक शब्दांच्या तपशीलांत शिरणें जरूर आहे. श्री. पां. वा. गाडगीळ, श्री. मानवेंद्र रॉय प्रभृति लेखकांनीं मार्क्सला फावरबाखच्या निव्वळ मानवधर्मवादी व बुद्धिप्रामाण्यवादी (humanist and rationalist) पायरीवर मार्गे खेचलें आहे. डार्विन, रूसो, टॉल्स्टॉय, मार्क्स, फावरबाख आणि त्यांच्या भरीला भगवद्गीताकार, गीतारहस्यकार

[ पुढील मजकूर पान ५८ बर बघावा

डॉ. मो. वा. चिपळूणकर

# डॉ. पां. वा. सुखात्मे

यंदा पुणें येथें भरणाऱ्या भारतीय शास्त्रीय परिषदेच्या संख्याशास्त्र-विभागाचें अध्यक्षपद प्रसिद्ध हिंदी संख्याशास्त्रज्ञ डॉ. **पां. वा. सुखात्मे** बी. एस्सी., पीएच्.डी., डी. एस्सी. (लंडन), एफ्. एन्. आय., यांना देण्यांत आलें आहे. शास्त्रीय जगतांत ज्या थोड्या महाराष्ट्रीय शास्त्रज्ञांनीं आपल्या कर्तबगारीनें हिंदुस्थानची प्रतिष्ठा वाढविली आहे अशांपैकींच ते एक होत, असें मोठ्या अभिमानानें म्हणतां येईल.

डॉ. सुखात्मे यांचा जन्म २७ जुलै १९११ला सातारा जिल्ह्यांतील बुधगांवीं झाला. त्यांचें शालेय शिक्षण पुणें येथील महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलमध्यें झालें. इ. स. १९३२ सालीं गणित व पदार्थविज्ञान हे विषय घेऊन ते फर्ग्युसन् कॉलेजांतून बी.एस्सी. झाले. लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजात प्रो. ई. एस्. पिअरसन् आणि जे. नायमन् यांच्या हाताखालीं संशोधन करून इ. स. १९३५ मध्यें पीएच्. डी. झाले व लगेच त्यांनीं रॉथमस्टेड येथील शेतकीविषयक प्रयोगशाळेंत आणि पुढें लंडनच्या गार्टन् प्रयोगशाळेंत प्रवेश मिळविला. तेथें त्यांनीं जगप्रसिद्ध संख्याशास्त्रज्ञ मि. आर. ए. फिशर यांच्या हाताखालीं या विषयांत उच्च दर्जाचें मौलिक संशोधन केलें, व यावरच त्यांना पुढें लंडन विद्यापीठाची डी. एस्सी. ही बहुमानाची पदवी मिळाली. या विषयांतील लंडन-विद्यापीठाची ही पदवी मिळविलेले अखिल हिंदुस्थानांत हे एकटेच गृहस्थ होत. त्यांच्या संशोधनांतील कांहीं महत्त्वाचा भाग शास्त्रीय जगतांत विशेष भारदस्त मानिलेल्या अशा लंडनच्या रॉयल सोसायटीच्या नियतकालिकांत ('फिलॉसॉफिकल् ट्रँझॅक्शन्स ऑफ दि रॉयल् सोसायटी', सेरीज ए, १९३८) मागाहून प्रसिद्ध करण्यांत आला.

हिंदुस्थानला परत आल्यानंतर ते कानपूरच्या 'इंडियन इनस्टिट्यूट ऑफ शुगर टेक्नॉलॉजी'मध्यें संख्याशास्त्रज्ञ म्हणून इ. स. १९३६ सालीं राहिले. इ. स. १९३८ मध्यें कांहीं दिवस संयुक्तप्रांत सरकारच्या 'ईकॉनॉमिक् ॲडव्हायसर'चे संख्याशास्त्रज्ञ म्हणून होते. पण लवकरच कलकत्याच्या "ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ हायजीन ॲन्ड पाब्लिक हेल्थ" या संस्थेंत दुय्यम प्राध्यापक म्हणून रुजू झाले. यानंतर इ. स. १९४० मध्यें 'इंपीरिअल (हल्लीं इंडियन) कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल् रीसर्च" या संस्थेचे प्रथम संख्याशास्त्रज्ञ व पुढें इ. स. १९४५ त तिचे संख्याशास्त्रविषयक सल्लागार झाले. या संस्थेला व प्रांतिक सरकारांना शेतकीविषयक प्रश्नांसंबंधीं मार्गदर्शन करणें हें त्यांचें मुख्य काम होय. याच पदावरून हिंदुस्थान सरकारचे एक चांचणीतज्ज्ञ म्हणूनहि ते काम करतात व यासाठीं सरकारच्या वेळोंवेळच्या गरजांनुसार चांचणी, नमुन्यांचा प्रस्ताव, पहाणी, आणि आंखणी, येवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष त्यांची अम्मलबजावणीहि त्यांना करावी लागते. याशिवाय निरनिराळ्या विद्यापीठांच्या पदव्युत्तर संशोधनपरीक्षांना बसणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शनासाठीं त्यांनीं एक प्रयोगशाळाहि दिल्लीस चालू केली आहे.

निरनिराळ्या भारतीय व परदेशी नियतकालिकांतून त्यांनीं आजपर्यंत ४० चे वर संशोधनात्मक निबंध प्रसिद्ध केले आहेत. पहिल्यापहिल्यानें त्यांचें








संशोधन शुद्ध स्वरूपाच्या विविध विषयांवर झालें; पण इ. स. १९४० नंतर मात्र 'नमुना-पद्धती 'नें गोळा करण्यांत येणाऱ्या शेतकीविषयक माहिती-संबंधीं आणि प्राणिसंवर्धनासंबंधींच अधिक झालें. या ठिकाणीं एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यांनीं आंखून दिलेल्या 'कोणतेही नमुने निवडण्याच्या ( random sampling ) पद्धती'नुसारच हल्लीं हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य पिकांचीं अंदाजीं उत्पन्नें ठरविण्यांत येत आहेत.

'नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ सायन्सेस ऑफ इंडिया' आणि 'इंडियन् ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस, बंगलोर', या दोन्ही संस्थांनीं त्यांना आपले सदस्य निवडून त्यांचा गौरव केला आहे. शिवाय "इंडिअन सोसायटी ऑफ अग्रिकल्चरल स्टॅटिस्टिक्स्" या संस्थेच्या नियतकालिकांचे ते एक संपादक आहेत.

युनोच्या "अन्न आणि शेतकी" या शाखेच्या 'स्टॅंडिंग् ॲड्व्हायजरी कमिटी ऑन् स्टॅटिस्टिक्स् 'चे ते उपाध्यक्ष आहेत. इ. स. १९४७ सालीं वॉशिंग्टन येथें भरलेल्या "इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑन् स्टॅटिस्टिक्स "ला हिंदच्या वतीनें ते हजर राहिले होते. त्याचप्रमाणें इ. स. १९४८ मध्यें सिंगापूरला भरलेल्या आग्नेय आशियाच्या 'स्टॅटिस्टिकल् कॉन्फरन्स'ला भारतीय प्रतिनिधींचे नेते म्हणून गेले होते. "इंटरनॅशनल् स्कूल ऑन् सेन्सस् ॲंड स्टॅटिस्टिक्स " या संस्थेचे ते इ. स. १९४९ सालचे डायरेक्टर आहेत. शिवाय अमेरिकेंतील आयोवा विद्यापीठाचे इ. स. १९५० सालचे "अभ्यागत प्राध्यापक " म्हणून त्यांची नेमणूक झाली आहे.

अशा तऱ्हेनें, वयानें व बांध्यानेंहि लहानच असलेल्या या महाराष्ट्रीय शास्त्रज्ञाची एवढ्यांतच सर्वत्र कीर्ति पसरली आहे. आजच्या जगाला ज्या जीवनावश्यक गोष्टीची अत्यंत वाण भासत आहे अशा अन्नधान्याच्या प्रश्नाशीं यांच्या विशेषतः अलीकडील संशोधनाचा प्रत्यक्ष संबंध असल्याकारणानें या आणीबाणीच्या काळांत त्यांच्या हातून अधिक उपयुक्त संशोधन व कार्य होवो आणि त्यांच्या आणि एकंदर भारताच्या कीर्तींत भर पडो असें आम्ही चिंतितों.

---

## विरोधविकास नव्हे, द्वंद्वात्मक स्वयंगति [ पान ५६ वरून चालू ]

टिळक, गांधीजी आदींच्या दर्शनांची बेमालूम भेसळ करून बनविलेलें स्वतःचें नवेंच दर्शन आपल्याकडील अशा लेखकांनीं वाचकांसमोर मांडलेलें आढळतें.

या संस्कृत, म्हणजे संस्कारित, 'मार्क्सवादा'ची नीट ओळख झाली तरच तद्भव पर्यायशब्दांची रूढ अनवस्था उमगेल. त्यासाठीं श्री. पां. वा. गाडगीळ प्रभृति लेखकांनींहि संशोधनाची तयारी ठेवून पुढें यावें व या क्षेत्रांत विचार व लेखन करणाऱ्या नव्या व जुन्या सर्वच लोकांनीं निरभिमानी व सहकारी वृत्तीनें एकत्र येऊन मार्क्सवादाच्या क्षेत्रांत येणाऱ्या पर्यायशब्दांचा एक समूह निश्चित ठरवावा, असें मला वाटतें. विचारांना व मराठी पर्यायशब्दांना काटेकोर अर्थ व अभिप्राय नुसते 'रुळण्याच्या प्रवाहांत' येतात, असें मला प्रथम वाटत होतें. पण मार्क्सवादाच्याच नव्हे तर एकंदरच मराठींत उतरणाऱ्या तत्त्वज्ञान, इतिहास,कला वगैरे क्षेत्रांतील नव्या मांडणीच्या बाबतींत अशी गोष्ट घडत नाहीं असा अनुभव सर्वांनाच येत असावा. तेव्हां या एका मर्यादित विशिष्ट क्षेत्रांत काटेकोर व अर्थवाहक मराठी पारिभाषा निर्माण व्हावी या दृष्टीनें माझ्या सूचना प्रस्तुत लेखांत मी मांडल्या आहेत.

---





अनुक्रमणिका

श्री. के. जी. सैयिदेन

# स्वतंत्र हिंदुस्थानांतील शास्त्रीय शिक्षण

विज्ञान[1] आणि लोकशाही ह्या आधुनिक जगांतील दोन प्रचंड शक्ती होत. विज्ञान आणि लोकशाही यांचा इतिहासपथ कितीहि चढ-उतारांनीं भरलेला असला, कित्येक वेळां तो भलत्याच दिशेनें गेलेला जरी दिसत असला, तरी हें खरें कीं आपल्या आधुनिक युगाचें आशास्थान विज्ञान व लोकशाही हींच होत. मानवाच्या प्रगतीच्या आड जीं अनेक जुलमी अशीं सामाजिक आणि राजकीय बंधनें येत आहेत, त्यांच्यापासून मानवाला मुक्त करून त्याला त्याचें मानवोचित मानाचें स्थान प्राप्त करून देणें हें लोकशाहीचें ध्येय आहे; तर वेड्या समजुती, अज्ञान आणि पुराणप्रियता यांच्या शृंखलांपासून मानवाच्या मनाची मुक्तता करून निसर्गाचे नियम व शक्ति यांचें ज्ञानपूर्वक नियमन करण्याचें आणि त्यांचा आपल्या उद्देशपूर्तीकरितां उपयोग करून घेण्याचें मानवाला सामर्थ्य देणें हें विज्ञानाचें ध्येय आहे. विज्ञान आणि लोकशाही हीं परस्परांपासून अगदीं भिन्न किंवा असंबद्ध अशीं नाहींत. उलट त्यांच्या प्रेरणांमध्यें व हेतूंमध्यें फार मोठा सुसंवाद असून त्यांचा परस्परसंबंध अत्यंत जिव्हाळ्याचा व स्फूर्तिदायी आहे.

आपले सामाजिक हेतू कोणते, आपल्या सामाजिक क्रियांचें उद्दिष्ट काय याची सुस्पष्ट कल्पना आपणांस लोकशाहीवरून येते. लोकशाहीचा असा दावा आहे कीं, सुखी, मंगल कल्याणमय जीवन (Good life) म्हणजेच आधुनिक सुधारणांनीं उपलब्ध करून दिलेल्या भौतिक आणि सांस्कृतिक सुखसोयींचा उपभोग, ही केवळ थोड्यांचीच मिरासदारी न रहातां तें जीवन सगळ्यांच्याच वांट्याला यावें. लोकशाहीचें हें उद्दिष्ट साध्य करायचें एक अत्यंत प्रभावी साधन म्हणजेच विज्ञान किंवा शास्त्र हें होय. लक्षावधी किंवा कोट्यवधी जनतेच्या इच्छा-आकांक्षा पूर्ण करून त्यांचें कल्याण करावयाचें ब्रीद लोकशाही बाळगते, तर त्याच जनतेला तें मांगल्यमय जीवन उपलब्ध करून देण्याचें सामर्थ्य विज्ञान मानवाला देते.

विज्ञानाचा उपयोग मानवाची निसर्गावरील सत्ता, मानवाचें उत्पादनसामर्थ्य हीं वाढविण्याकरितांच करून घेतला पाहिजे हें अर्थात् गृहीतच आहे. परंतु या बाबतींतहि सर्व विचारवंतांत एकवाक्यता दिसून येत नाहीं. कांहींना असें वाटतें कीं "आपण विज्ञानाचा फारच 'उदोउदो' चालविला आहे! या विज्ञानानें आपलें कल्याण तर कांहीं केलें नाहींच. उलट त्यामुळें माणसाचा लोभ मात्र वाढला असून नवनवीन संघर्ष आणि दुःखें मात्र निर्माण झालीं आहेत." आपलें जीवन साधेपणानें व्यतीत केलें पाहिजे, आपल्या वासनांचें नियमन करून आपल्या गरजा कमी केल्या पाहिजेत, अशी या विचारवंतांची तात्त्विक भूमिका आहे.

---

[1] मुंबई सरकारचे शिक्षणविषयक सल्लागार श्री. सैयिदेन यांनीं Hindustan Review मध्यें Scientific Education in Free India असा एक लेख लिहिला आहे. त्याचा प्रस्तुत लेख हा संक्षिप्त सारांश आहे—का. सं.








दुसरेही कांहीं विचारवंत असे आहेत कीं, यंत्र-प्रधान उद्योगधंदे आणि युद्धें या द्वारें विज्ञानानें जें अमानुष थैमान घालून अनर्थ माजविला आहे, त्यानें ते स्तिमित होऊन गेले आहेत ! त्यांचें म्हणणें असें कीं " या भयंकर दैत्याचे, या भस्मासुराचे हे जीवघेणे चाळे पुरे झाले; त्याला आतां बांधून कोंडून ठेवा ! " कांहीं वर्षांपूर्वी अमेरिकन विचारवंतांच्या एका वजनदार संस्थेनें असें मत प्रदर्शित केलें होतें कीं विज्ञानाला आतां कांहीं दिवस, निदान दहा वर्षे तरी सुटी द्यावी ! आणि हें मत त्यांनीं, तो प्रलयकाली अणुबॉंब पडण्यापूर्वी, प्रदर्शित केलेलें होतें ! म्हणूनच प्रश्न असा उभा राहतो कीं हिंदुस्थाननें विज्ञानाविषयीं कोणती वृत्ति धरावी ? हिंदुस्थानचें ब्रीद शांति हें आहे ! हिंदुस्थानला महान् आध्यात्मिक संपत्तीचा श्रेष्ठ वारसा आहे. त्यावरच घाला घालायला उद्युक्त झालेल्या विज्ञानाशीं हिंदुस्थाननें कोणती वृत्ति ठेवावी ?

विज्ञानाला अजीबात धुडकावून लावणें कोणीच मान्य करणार नाहीं. 'फ्लश' पद्धति,मोटरी, रेडिओ, टेलिफोन यांसारख्या मानवाचे श्रम वांचविणाऱ्या ज्या अनेक युक्त्या-प्रयुक्त्या आणि सुखसोयी विज्ञानानें उपलब्ध करून दिल्या आहेत, त्या नाकारण्यापर्यंत कोणा विरोधकाची मजल जाईल असें वाटत नाहीं. विरोधकांचा मुख्यतः विरोध कोणत्या गोष्टीबद्दल असेल तर आर्थिक आणि औद्योगिक क्षेत्रांत आणि युद्धांत होणाऱ्या विज्ञानाच्या दुरुपयोगाबद्दल. कारण, विज्ञानाचा उपयोग उद्योगधंद्यांतून दीनांची पिळवणूक करण्याकडे आणि युद्धांतून अमानुष संहार करण्याकडे केला जात आहे. असा विज्ञानाचा उपयोग केला जावा याला याला अर्थात् कोणीच मान्यता देणार नाहीं. मग प्रश्न असा उपस्थित होतो कीं, वैज्ञानिक प्रगति आणि विज्ञानाचा हा दुरुपयोग यांचा अविभाज्य असा संबंधच आहे काय ? का विज्ञानाचा हा दुरुपयोग विज्ञानापासून पूर्णपणें भिन्न अशा कारणपरंपरेचा परिपाक आहे ? विज्ञानाबद्दल आपण वृत्ति कशी ठेवावयाची याचें उत्तर या प्रश्नाच्या उत्तरावरच अवलंबून रहाणार आहे.

विज्ञानाचें मानवी जीवनांत नक्की स्थान कोणतें? भौतिक विश्वांतील निरनिराळ्या शक्तींचें आकलन करून घेण्याचा आणि त्यांचा आपल्या हेतुपूर्तीकरतां उपयोग करून घेण्याचा मानवी मनाचा विज्ञान हा एक प्रयत्न होय. हा पराक्रमी प्रयत्न करीत असतांना मानवी मनानें सतत व्यासंग, मानसिक एकाग्रता, समोर असलेल्या प्रमाणांचें व निगमनांचें निराग्रही मूल्यमापन, कठोर सत्यसंशोधन-अशा प्रक्रियेनें युक्त असें एक विशिष्ट तंत्र निर्माण केलें आहे. या वैज्ञानिक दृष्टिकोनामुळें मानव हा ठोकळ अनुमानधक्क्यांच्या, वेडगळ धर्मसमजुतींच्या, व पुराणमतवादाच्या पलीकडे गेला असून, बुद्धीच्या कसोटीला जें पटत नाहीं, तें स्वीकारावयाचें नाहीं अशी त्याची प्रवृत्ति बनली आहे. सतत परिश्रम व चिकाटी यांच्या बळावर मानवानें पदार्थविज्ञान, रसायन, वनस्पति, वैद्यक, कृषि वगैरे उपराज्यांनीं समृद्ध असें विज्ञानाचें वैभवशाली साम्राज्य कमाविलें आहे. कांहीं वैज्ञानिक या साम्राज्याच्या सीमा विस्तृत करण्याच्या मागें लागले आहेत, तर कांहीं या विज्ञानाचा उपयोग मानवजातीच्या व्यावहारिक गरजांकरितां करीत आहेत. ह्या दोन्हीही वैज्ञानिकांचीं कार्यें परस्परांना पूरक असलीं तरी दुसऱ्या प्रकारच्या वैज्ञानिकांच्या कार्यानें यंत्रविद्येची बेसुमार वाढ झाली असून त्या योगानें मानवाचें उत्पादनसामर्थ्य इतकें कल्पनातीत वाढलें आहे कीं उलट त्याचे स्वास्थ्यविघातकच परिणाम मानवाला भोंवूं लागले आहेत !

यावरून हें स्पष्ट होईल कीं, भांडवलशाहीच्या दुष्परिणामांची किंवा आधुनिक युद्धाच्या भीषण संहाराची जबाबदारी नुसत्या विज्ञानावर टाकतां येत नाहीं. इतर साधनें व हत्यारें जशीं तसेंच विज्ञान पण एक साधन आहे. त्याचा उपयोग कसा करावयाचा हें त्या साधनाच्या योजकावर, त्या योजकाचा वैयक्तिक व सामाजिक हेतु काय आहे यावर अवलंबून आहे. घरगुतीच उदाहरण द्यायचें तर, विजेचा प्रवाह एकच, पण त्यानें दिवे लावायचे कीं माणसाला फांशी ( electrocute ) द्यायचें कीं सबंध शहराचा सत्यानाश करणारा बॉंबचा बार उडवून





[अनुक्रमणिका](#)

द्यायचा, हें त्या शोधकावरच अवलंबून रहाणार ! म्हणूनच जल-विद्युद्यंत्रें मोडींत काढून ( Scrap ) फेंकून देण्यानें किंवा जल-विद्युद्-योजना स्थगित करण्यानें काम भागणार नाहीं. ज्यांच्या हातीं ही विज्ञानदत्त शक्ति आली आहे त्यांना सामाजिक प्रेरणा आहे कीं नाहीं, ती शक्ति स्वार्थाकरितां वापरायचा त्यांना मोह होऊन त्यांची बुद्धि भ्रष्ट होत आहे कीं काय, हें पाहण्याकरितां त्यांच्यावर लोकसत्तेची सक्त नजर आहे कीं नाहीं, हाच मुख्य प्रश्न आहे. अणुबॉंब आणि टी. व्ही. ए. योजना ह्या दोन्हींची वाढ अमेरिकेंतच झाली; ... पहिला संस्कृतीच्या मुळावरच आला आहे कीं काय अशी भीति उत्पन्न झाली आहे, तर दुसरा-मुळें एका उपेक्षित आणि मागसलेल्या भागांत नंदनवन निर्माण होण्याची शक्यता निर्माण झाली आहे ! म्हणून हिंदुस्थानांत विज्ञानाचा उपयोग करावयाचा म्हणजे त्याचीं उद्दिष्टें आपण प्रथमतः निश्चित केलीं पाहिजेत. त्या उद्दिष्टांमध्यें अनुक्रमें आरोग्याचें संवर्धन, दारिद्र्याचें उच्चाटन, शिक्षण व संस्कृति यांचा प्रसार यांनाच प्राथम्य दिलें पाहिजे.

अर्थात् ह्या गोष्टी सोप्या नाहींत. अन्न, वस्त्र व यंत्रें वगैरे वस्तूंचें उत्पादन वाढवावचें खरें. पण या उत्पादनाची सांगड हल्लीं नफेबाजीशीं घातली जाते. कोणत्याही औद्योगिक योजनेंत हल्लीं हाच मोठा धोका असतो. ज्या वस्तूंची लोकांना अत्यंत निकडीची गरज आहे, त्यांना प्राथम्य न देतां भांडवल घालणारांना अविलंबानें अधिकांत अधिक नफा कसा मिळेल यालाच महत्त्व दिलें जातें. हा धोका ओळखून हिंदी राष्ट्रीय सरकारनें असा आग्रह धरला पाहिजे कीं प्रथम गोष्टींनाच प्रथम प्राथम्य ( priority ) मिळालें पाहिजे, त्याकरितांच विज्ञानाचा पुरेपूर उपयोग करून घेतला पाहिजे; पण तो करून घेतांना त्याचीं फळें बडे भांडवलवालेच उपटणार नाहींत याला डोळ्यांत तेल घालून जपलें पाहिजे ! आधुनिक विज्ञानाचें मानवाला एक मोठें वरप्रदान मिळालें आहे. विज्ञानानें मानवाला प्राचीन युगानुयुगें चालत आलेल्या दुर्भिक्षाच्या अंधकारयुगांतून वैपुल्याच्या आणि संपन्नतेच्या प्रकाशमय युगांत आणून सोडलें आहे. त्यामुळें परस्परांमधील संघर्षाचीं व पिळणुकीचीं विषबीजें नष्ट करून समृद्ध आणि मांगल्यमय जीवन मानवाला भविष्यकाळांत शक्य झालें आहे. कोणी म्हणेल, अन्नाची टंचाई व इतर हालअपेष्टा माणसापुढें आज 'आ' वासून उभ्या असतांना, ही भविष्यकाळची आशा व्यर्थच नव्हे का ? परंतु सध्यांच्या अनर्थकारक परिस्थितीला कारण विज्ञानाचें वैयर्थ्य हें नसून इतरच कारणें आहेत. नुकतेंच अमानुषसंहारकारक असें महायुद्ध होऊन गेलें आहे. त्या युद्धानें भडकलेली लोकांचीं माथीं अजूनहि शांत झालेलीं नाहींत. राष्ट्रांराष्ट्रांमध्यें पुरेशी सदिच्छा व सहकार्य नाहीं; त्यामुळें रक्तपिपासु रणदैत्य अद्याप जिवंत असून, बिचाऱ्या शांतीचीं मंगल विधायक कार्यें मागें पडलीं आहेत. याउलट, जर अणुशक्तीची संहारक बाजू टाळण्याची प्रेरणा व सुबुद्धि माणसाला झाली, आणि त्या शक्तीच्या विधायक बाजूचा जर विकास घडवून आणला, तर मानवाच्या उज्ज्वल भवितव्याला पारावार रहाणार नाहीं.

सरकारनें आपल्या योजनांमध्यें विज्ञानविषयक शिक्षणाला मानाचें स्थान दिलें पाहिजे; त्याबरोबरच आमच्या शास्त्रज्ञांनीं आपली दृष्टि सामाजिक आणि विशाल बनविली पाहिजे. विज्ञानांत जी कांहीं नवीन भर पडेल तिचा उपयोग मानव्यपूर्ण आणि सामाजिक सत्कार्यांकरितां झाला पाहिजे, ती भांडवलदार-श्रेष्ठींच्या किंवा लष्करी हुकुमशहांच्या तावडींत जातां कामा नये, याबद्दल शास्त्रज्ञांनीं जागरूक राहिलें पाहिजे.

वर एका गोष्टीचा ओझरता उल्लेख आला आहे; परंतु तिचाच पुन्हां प्रामुख्यानें निर्देश करणें आवश्यक आहे. ती गोष्ट म्हणजे वैज्ञानिक वृत्तीचें व तंत्राचें महत्त्व. विज्ञान किंवा शास्त्र म्हणजे केवळ भौतिक उत्पादनाचेंच केवळ तंत्र नव्हे; ती एक प्रकारची बौद्धिक शिस्त आहे, एक विशिष्ट मनोवृत्ति आहे, जीवनांतील प्रश्न सोडविण्याचा व्यापक असा दृष्टिकोन आहे. खरी शास्त्रीय मनोवृत्ति ही अंधश्रद्धेच्या, आग्रहाच्या विरुद्ध असते. कोणत्याही प्रसंगीं खऱ्या शास्त्रीय मनोवृत्तीची प्रतिक्रिया विकारवशतेच्या रूपानें प्रकट होत नाहीं. विकारवशतेची प्रतिक्रिया म्हणजेच अविवेकी पूर्वग्रहदूषित वृत्ति.

याउलट शास्त्रीय मनोवृत्ति ही शेवटपर्यंत बुद्धिवादाचा निर्भयपणें पुरस्कार करते; राष्ट्रवाद, जातिवाद, वंशवाद यासारख्या सामान्य माणसाला फर्शी पाडणाऱ्या घोषवाक्यांचा आणि जुन्या-पुराण्या मतांचा इन्कार करते.

खऱ्या-खुऱ्या शास्त्रीय शिक्षणाच्या बाजूनें अत्यंत महत्त्वाचा मुद्दा असा आहे कीं, जनतेच्या मनांतील अविवेकी भीति आणि दुराग्रह नष्ट करून जनतेला सामाजिक आणि आर्थिक प्रश्नांकडे निराग्रही आणि बुद्धिवादी भूमिकेवरून पहायला शिकवायचें असेल तर शास्त्रीय शिक्षणाचाच अधिकाधिक प्रसार झाला पाहिजे. शास्त्रीय शिक्षण केवळ प्रयोगशाळेच्या चार भिंतीं-आड न राहतां, त्यानें आमचें सर्व जीवन व्यापून टाकलें पाहिजे. आमची समाजाकडे पाहण्याची वृत्ति शास्त्राच्या रंगानें रंगली पाहिजे, प्रकाशमान झाली पाहिजे. असेहि कांहीं शास्त्रज्ञ आढळून येतात कीं त्यांनीं आपापल्या विशिष्ट क्षेत्रांत फार थोर कामगिरी केलेली आहे पण त्या क्षेत्राबाहेर मात्र त्यांची दृष्टि अविवेकी आणि वटवाघुळाप्रमाणें आंधळी असते! अशांना शास्त्रीय पद्धति अवगत झाली असेल; पण खरें शास्त्रीय शिक्षण त्यांना मिळालेलें नसतें हें खरें. म्हणूनच आपला शास्त्रीय शिक्षणाचा दृष्टिकोण आमूलाग्र बदलला पाहिजे. शास्त्रीय शिक्षणाची साधनसामुग्री वैपुल्यानें उपलब्ध करून दिली पाहिजे. सुप्रसिद्ध इंग्लिश हेडमास्तर Oundle चे सँडर्सन[२] यांनीं आपल्या शाळेंतील शास्त्रीय शिक्षणांत जें नवीन चैतन्य संचारित केलें, त्या चैतन्याचा शास्त्रीय शिक्षणांत संचार झाला पाहिजे.

जर असें होऊं शकलें नाहीं, तर आपल्या शिक्षणानें सामाजिक जीवनाला किंवा मानवी मनाला चैतन्यप्रद प्रेरणा न मिळतां तें शिक्षण निर्जीव आणि कुचकामाचें ठरेल!

---

[२] 'The Story of a great School-master' by H. G. Wells पहा.

---

## "हिंदी इतिहासांत भर"!

मि. रेजिनाल्ड रेनॉल्ड्स् हे डिसेंबरांत भरणाऱ्या विश्वशांतता–परिषदेंत भाग घेण्यासाठीं हिंदुस्थानांत आले असतां त्यांनीं साबरमती आश्रमाला व गुजरात विद्यापीठाला भेट दिली. इर्विन कराराच्या वेळीं लॉर्ड इर्विन–( हल्लीं हॅलिफॅक्स )–साहेबांना द्यावयाचें पत्र गांधीजींनीं त्यांच्याजवळ दिलें होतें. त्यासंबंधीं बोलतांना रेनॉल्ड्स्नीं पुढील गंमतीची आठवण 'श्री. महादेवभाई समाजसेवा-महाविद्यालया'च्या विद्यार्थ्यांना सांगितली :

"बापूंनीं जें पत्र लॉर्ड इर्विनसाहेबांच्या हातीं द्यावयासाठीं मजजवळ दिलें त्याबाबत मला तुम्हांला कांहीं सांगावयाचें आहे. तें तुम्हां कोणाला माहीतहि नसेल. तें मी प्रथमच जाहीरपणें सांगणार आहे. बापूंनीं मला तें पत्र दिलें व म्हणाले कीं, 'हें पत्र वाचा आणि यांत लिहिलेल्या बाबतींत तुमचें मन निःसंकोचपणें संमति देत असेल तरच तें तुम्हीं लॉर्ड इर्विनकडे पोंचतें करा.'

"मी तें पत्र वाचलें आणि बापूंना म्हटलें, 'बापू, यांत एके ठिकाणीं बरोबर वाटत नाहीं.'

"बापू म्हणाले, 'काय आहे?'

"मी म्हणालों, 'यांत एक स्वल्पविराम कमी पडत आहे!'

"अशा प्रकारें मी हिंदुस्तानच्या इतिहासांत जर कांहीं भर घातली असेल तर ती एवढा स्वल्पविराम वाढवून घेण्यापुरतीच होय!"

—"शिक्षण अने साहित्य", डिसें. १९४९ वरून.

# सार संकलन

## शास्त्रीय संशोधन आणि रशियाचें धोरण

भारतीय विज्ञानपरिषदेचें अधिवेशन भरण्याच्या निमित्तानें, आजच्या शास्त्रीय जगांत ज्या एका घटनेनें खूप खळबळ उडाली, आरोप-प्रत्यारोप केले गेले तिचा परिचय करून घेणें अत्यावश्यक आहे. ती म्हणजे लायसेन्को या प्रसिद्ध रशियन 'नव-अनुवंशशास्त्र (New Genetics)'वादी शास्त्रज्ञाच्या अध्यक्षतेखालीं रशियांत 'लेनिन् ॲकॅडेमी ऑफ् ॲग्रिकल्चरल सायन्स' या संस्थेनें केलेली जाहीर चर्चा आणि त्या चर्चेंतील प्रभावी मतप्रवाहाच्या अनुरोधानें रशियन सरकारनें आपलें बदललेलें धोरण ही होय. यासंबंधीं बरीच माहिती 'सायन्स ॲन्ड सोसायटी' या त्रैमासिकाचे हिंवाळा अंक (१९४८-४९), वसंत अंक (१९४९), आणि 'मॉडर्न क्वार्टली'चे हिंवाळा (१९४८-४९) व वर्षा (१९४९) अंक यांमधून आलेली आहे. तिचा सारांश येथें दिला आहे.

या एकंदर चर्चेची रीतहि मोठी गमतीची होती. आम जनतेच्यासमोर शास्त्रीय प्रमेयांची चर्चा करून तेथें निर्णय घेण्याचा एकंदर प्रकार पश्चिमेकडील संस्कारांनीं बद्ध झालेल्या शास्त्रज्ञांना चमत्कारिकच वाटला. या चर्चेच्या निर्णयावरून रशियन सरकारनें जीर्णमताच्या मेन्डेलवादी अनुवंशशास्त्रज्ञांना व संस्थांना दिली जाणारी सरकारी मदत काढून घेण्याचें ठरविलें. त्यामुळें कित्येक शास्त्रज्ञांना आपल्या नोकऱ्या गमावणें भाग पडलें. याचें वर्णन 'रशियन हुकुमशाहीचा वरवंटा' असें करून, रशियन शास्त्रज्ञांनीं जुन्या अनुवंशशास्त्राविरुद्ध घेतलेले आक्षेप ज्या प्रयोगांवर आधारलेले तेच बनावट होते, खरे प्रयोग झालेच नाहींत वगैरे खरेखोटे आरोपहि केले गेले. रशियांतलि सर्वच कारभारावर असणारा 'पोलादी' पडदा याबाबतहि विशेष उजेड पडूं शकला नाहीं! आंतरराष्ट्रीय महत्त्वाचे निर्णय आंतरराष्ट्रीय शास्त्रज्ञांना पटेपर्यंत गृहीत न धरण्याकडे अजूनपर्यंत प्रवृत्ति असे. ती रशियानें बदलली. फक्त चर्चा जाहीर झाली, प्रयोग प्रत्यक्ष पाहावयास कोणतेंहि निःपक्षपाती कमिशन गेलेलें नव्हतें व त्याच्यादेखत कांहीं हे प्रयोग झालेले नव्हते. तेव्हां अशा परिस्थितींत पुढें आलेल्या माहितीच्या सत्यत्वाबद्दल शंका येणें संभवनीय होतें. परंतु एकंदर वादाची माहिती गोळा केल्यावर असें वाटतें कीं रशियानें जुन्या व नव्या (विरोधविकासवादी) अनुवंशशास्त्रज्ञांना आपल्या शेतकीसंशोधनाच्या प्रचंड योजनेंत सारखेंच साहाय्य केलें होतें. व्हाव्हिलोव्ह हा जुन्या मेन्डेलवादी गटाचा प्रमुख होता व मिच्यूरिन नव्या मार्क्सवादी दृष्टीचा प्रमुख होता. पांचसहा वर्षांच्या अवधींत योजनाबद्ध संशोधनाला आवश्यक ती विशेष प्रगति व्हाव्हिलोव्हला करतां आली नाहीं. उलट मिच्यूरिननें 'पावसाळी गव्हांतून हिंवाळी गहूं' कलमपद्धतीनें निर्माण करून दाखविला. लायसेन्को हा मिच्यूरिनच्या 'समग्र परिस्थिती'च्या दृष्टीचा पुरस्कर्ता होता[1]. या चर्चेच्या वेळीं हजर

१ लायसेन्कोनें मिच्यूरिन्चा 'नव अनुवंशशास्त्रा'चा सिद्धांत पुढीलप्रमाणें मांडला आहे :

In the cases where the organism finds in the environment conditions which correspond to its heredity, the development of the organism

[ तळटीप पुढील पानावर चालू








असलेल्या मेन्डेल–मॉर्गन–पंथाच्या रशियन शास्त्रज्ञांना आपला प्रभाव पाडतां आला नाहीं. शेवटीं रशियन सरकारनें आपली मदत बरीचशी कमी करून मिच्यूरिनवादी संशोधनाला जास्त साह्य दिलें. अजूनहि बरेच जुन्या मताचे शास्त्रज्ञ कामावर आहेतच. पण त्यांचें महत्त्व कमी झालेलें आहे यांत शंका नाहीं.

शास्त्रीय जगांत जी खळबळ उडाली ती लायसेन्कोनें अनुवंशशास्त्रावर चढविलेल्या हल्ल्यामुळें होय. या जुन्या मताचा आधार मेन्डेलचा अनुवंशाबद्दलचा सिद्धांत हा होता. त्याचें जें स्पष्टीकरण अमेरिकन शास्त्रज्ञ मॉर्गन यानें बऱ्याच वर्षांपूर्वी दिलेलें होतें पण पुन्हां तसेंच मुद्रित झालें होतें तेंच १९४८ सालीं 'जुन्यां'चें अद्ययावत संशोधन मानून तो हल्ला चढविला होता. मुख्य वादाचा मुद्दा असा : आनुवंशिकतेला कारण होणारे 'क्रोमोसोम्स्' हे जीवाणू 'जेन' नांवाच्या परमाणूंनीं युक्त असतात. हे जेन्स 'न्यूक्लस'च्या बाजूला रांगेनें असतात. या जेन्स्वर सर्व आनुवंशिकता आधारलेली असते. परिस्थितीचा परिणाम, जेन्स्ची परस्परांवर होणारी अंतर्गत क्रिया (interactions)–ज्याला 'जेन इफेक्ट' म्हणतात तिचा परिणाम— वगैरे परिणाम क्रॉमोसोमच्या इतर भागांवर होतात. पण स्वतः 'जेन्स्'चा भाग त्या सर्व बाह्य परिणामांपासून अलिप्त राहतो. म्हणजेच आनुवंशिकता ही एक आगाऊ निश्चित अशी घटना असते. जेन्स्च्या संक्रमणांत एखाद्या पिढींतील व्यक्तींत त्यांचें 'म्यूटेशन' किंवा परिवर्तन घडून वेगळीच आनुवंशिक छटा दृग्गोचर होते हें खरें. पण याचें कारण कोणताहि बाह्य परिणाम नसतो हें निश्चित. आनुवंशिकता हा पूर्णपणें निसर्गाचा खेळ आहे. मनुष्यकृत किंवा मनुष्यज्ञात अशा कोणत्याहि कारणानें त्यांत बदल होत नाहीं. मेन्डेलवादाचा हा पाया आहे. पण याप्रमाणें प्रयोग करतां करतां पाश्चात्य शास्त्रज्ञांना कांहीं उपांगभूत-गृहीतकृत्यें मान्य करून नवीन प्रमेयें सोडवावीं लागलीं. 'जेन इफेक्ट'ला मान्यता हें मूळ सिद्धान्ताला जी मुरड घालावी लागली त्याचेंच उदाहरण आहे. विशेष म्हणजे असें कीं 'स्टाफीलोकोकुस ओरीअस' नांवाच्या जीवाणूंत आकार व गुणधर्म यांच्यांत फार विचित्र फेरबदल प्रयोगाच्या परिणामानें झाल्याचें पुढें गेल नांवाच्या प्रयोगकर्त्याला आढळलें. हें मोठें गूढ होतें. पावसाळी गव्हाचा हिंवाळी गहूं पिकविण्याइतकें आश्चर्यकारक हें नक्कीच होतें. आणि हे प्रयोग रशियांत झालेले नव्हते, तर विरोधविकासवाद मान्य नसलेल्या पाश्चात्य जगांत घडलेले होते ! वाइझ्मनच्या जुन्या सिद्धांताचा पाठपुरावा आतां कोणीहि संशोधक शास्त्रज्ञ करीत नाहीं. केवळ पाठ्यपुस्तकांत असे संदर्भ असल्यावरून त्यावर भडिमार करणें हें अद्ययावत् दृष्टीच्या शास्त्रीय जिज्ञासेला विसंगत आहे असें बर्नहार्ड जे. स्टर्न या कोलंबिया विद्यापीठांतील शास्त्रज्ञाचें म्हणणें आहे.

प्रो. जे. बी. एस्. हाल्डेन या विरोधविकासवादी प्रोफेसरांचें या 'जेनेटिक्स्' बाबतींतील

---

तळटीप मागील पानावरून चालू ]

proceeds in an identical manner with that of preceding generations. But in those cases where the organisms do not encounter the conditions which they require and are obliged to adapt themselves to the actual conditions of the ambience, which, to a greater or lesser degree, does not correspond to their nature, the result is organisms or certain parts of their bodies, which are more or less differentiated from the preceding generation. If the part of the body which is modified is precisely the part out of which the succeeding generation has come, the latter, both because of its needs and because of its nature, will be differentiated to some extent from the preceding generations.

वादासंबंधांत राशियाविरुद्ध मत आहे, हें वरवर पाहतां विचित्र वाटतें. त्यांनीं एका रेडियो भाषणांत सर्वसाधारण राशियन शास्त्रीय दृष्टिकोणाचा पाठपुरावा केला होता. पण अलीकडच्या एका लेखांत ( " मॉडर्न क्वार्टर्ली "तील " इन् डिफेन्स ऑफ् जेनेटिक्स् " ) त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, " मी डार्विनवादी आहे तसाच मी मेन्डेलिस्ट—मॉर्गन पंथाचाही आहे. " त्यांनीं पुढें निःसंदिग्धपणें सांगून टाकलें आहे कीं, " हे लायसेन्कोप्रणीत ' जेनेटिक्स्'-वरील हल्ले शास्त्रीय मानावयाचे तर आपणांला चाळीस वर्षांपूर्वीच्या ' जेनेटिक्स'चा विचार करावा लागेल. वाइझ्मन आतां जुनापुराणा झाला आहे हे बहुतेकांना मान्यच आहे. तेव्हां लायसेन्को—संशोधनाचे तात्त्विक विचाराच्या दृष्टीनें फायदे मान्य करूनहि या जेनेटिक्सबद्दलच्या विशिष्ट तपशीलाबाबत मात्र माझ्या व्यवसायावरील हे हल्ले अगदीं असमर्थनीय आहेत." (वॅडिंग्टन् यांनीं जॉन लँग्डन—डेव्हीसकृत " राशिया पुट्स् दि क्लॉक बॅक " या पुस्तकाचें ' न्यू स्टेट्समन् अॅन्ड नेशन'च्या १५ऑक्टोबर १९४९ च्या अंकांत परीक्षण केलें आहे. त्यांत हे हॉल्डेनचे उतारे दिले आहेत. )

वर जी शुद्ध तात्त्विक मुद्द्याची गोष्ट आहे, तींच महत्त्वाची आहे.पाश्चात्य शास्त्रज्ञ जेन्स्‌विषयक संशोधन एखाद्या वेगळ्या काढलेल्या तपशीलाबाबत गृहीत कृत्य मानून करीत असतात, व तेवढ्याच परिस्थितीचा विचार करून जेन्स् हे परिस्थितिनिरपेक्ष आहेत असा सिद्धांत प्रतिपादीत असतात. उलट, एकंदर 'समग्र परिस्थिती'चे घटक विचारांत घेतल्यानें म्हणजेच अंतर्गत प्रतिक्रियांची ( interactions किंवा conflictsची ) योग्य परीस्थितींत मांडणी केल्यानें मिच्यूरिन व इतर विरोधविकासवादी राशियन प्रयोगकर्ते यांच्या विचारसरणीचें फळ प्रत्ययास येतें. राशियांत झालेल्या प्रयोगामुळें त्यांचें हें म्हणणें अत्यंत सयुक्तिक वाटतें असे प्रेनॉं व लेव्ही हे फ्रेंच शास्त्रज्ञ मानतात. वॅडिंग्टन या इंग्रज शास्त्रज्ञानें वर उल्लेखिलेल्या परीक्षणांत असें म्हटलें आहे कीं, 'क्रोमोसोमद्वारा न घडणाऱ्या आनुवांशिकतेच्या विभागांत आणि जंतुबीज व आनुवंशिक घटक यांमधील परस्पर-संबंधाबाबत हें राशियन संशोधन नवीन दिशा दाखवितें; परंतु राशियन संशोधकांनीं आंतर-राष्ट्रीय मार्गाचा अवलंब न करतां जुन्या झालेल्या लिखाणाच्या साहाय्यानें हल्ले चढवले हें मात्र गैर वाटल्यावांचून राहत नाहीं '. तसेंच आपल्या सिद्धांतांना आंतरराष्ट्रीय मान्यता मिळण्या-साठीं प्रयोगशाला खुल्या असाव्या लागतात, प्रयोगांचें नीट बारकाईनें त्रयस्थांकडून निरीक्षण व्हावें लागतें. तें तर सध्यांच्या राशियन राजवटींत सुतराम् अशक्य झालेलें आहे.आणि पूर्वीचा सिद्धांत खोडायला साधन म्हणून पुढें आणलेलें कांहीं नवीन संशोधन तर पश्चिमेकडील बिनविरोधविकासवादी शास्त्रज्ञांना पूर्वींच कळून आलेलें आहे. मेंडेल सिद्धांताला पोटसिद्धांत जोडून त्यांनीं त्या नवीन गोष्टींचें स्पष्टीकरण दिलेलें आहे. म्हणून या शास्त्रीय मुद्द्याबाबत आज तरी विरोधविकासवादी असूनहि राशियन शास्त्रज्ञांना विरोध करणाऱ्या प्रो. हाल्डेन या शास्त्रज्ञासारखेंच कोणालाहि वाटेल किंवा वॅडिंग्टनचें मत अधिक स्वीकरणीय वाटेल.

तात्त्विक क्षेत्रांत या चर्चेनें जो संघर्ष उत्पन्न केला आहे तो मोठा विस्मयकारक आहे. ' साम्य-वादी ' शास्त्राच्या उदयापूर्वी तात्त्विक बैठकीवरून शास्त्रज्ञांचे कल्पनावादी ( Idealist ) किंवा चेतन-वादा ( vitalism )चे अनुयायी आणि यांत्रिकता-वादी किंवा जडवादी असे वर्ग पडत. आतां शास्त्रीय संशोधन हें प्रत्यक्षवादी असल्यामुळें तें बहुतेक जडवादी—यांत्रिकतावादीच बनलें होतें. तोंच या प्रगतिहीन जडवादाला विरोधविकासी जडवादानें जोरानें धक्का दिला आहे. हाल्डेन,बर्नाल व लेव्ही या शास्त्रज्ञत्रयीनें इंग्लंडांत विरोधविकास-विचारसरणी प्रसृत केली; पण त्यांपैकीं हाल्डेनच कांहीं उत्साही शास्त्रज्ञांना कांहीं बाबतींत विरोधविकासी नसून अजूनहि ' यांत्रिकतावादी 'च वाटतात.

लायसेन्कोच्या अध्यक्षत्वाखालीं ही जी सुविस्तृत चर्चा झाली तिचीं वृत्तें ' प्रवदा 'नें आठ अंकांतून सविस्तर प्रसिद्ध केलीं; तिच्या दोन लक्ष टंकमुद्रित प्रती माफक किंमतीनें विकायला







ठेवल्या. सामान्य लोकांनाहि त्यांत भाग घेतां आला. शास्त्रचर्चेला असें महत्त्व इंग्लंड–अमेरिकेंतील वृत्तपत्रें देत नाहींत. या चर्चेतलि पातळी वॅडिंग्टनच्या मतें अव्वल शास्त्रीय नव्हती, तसेंच चर्चेची 'पॉलेमिकल' (वाग्युद्धात्मक) पद्धति इंग्लिश वाचकाला अठराव्या शतकांतील वाटण्याचा संभव आहे. शिवाय तेथें जमलेले बहुसंख्य संशोधक टेक्निशिअन्स होते, शास्त्रज्ञ संशोधक नव्हते असेंहि म्हणण्यांत आलें आहे. परंतु रशियन सरकार या संशोधनाला–अगदीं जुन्या 'मेंडेलवादी' व्हाव्हिलोव्हला–जी मदत देत होते, ती फ्रान्समध्यें शेतकीसाठीं मिळणाऱ्या मदतीपेक्षां कितीतरी अधिक आहे असें प्रेनॉ यांनीं म्हटलें आहे. या सर्व प्रकारामुळें जगांतलि इतर राष्ट्रांना विस्मय वाटावा व त्यांपैकीं कित्येकांनीं बिनपुराव्याचे आक्षेप घ्यायला सुरवात करावी हें मनुष्य-स्वभावाला धरून असलें तरी शास्त्रीय वृत्तीला पोषक नाहीं. ही समग्र चर्चा सुबोध भाषांतररूपानें The Situation in Biological Science या नांवानें इंग्रजींत प्रसिद्ध झाली आहे. "मॉडर्न क्वार्टर्ली"च्या १९४९ च्या वर्षा–अंकांत फाइफ व ब्रिआन यांनीं या पुस्तकाचें परीक्षण केलें असून त्या दोघांना अनुक्रमें तात्त्विक व तांत्रिक दोन्हीं दृष्टींनीं ही चर्चा प्रतिपक्षाला निरुत्तर करणारी वाटते. वॅडिंग्टनचें मत मात्र असें आहे कीं, ही सर्व 'चर्चा' निकृष्ट प्रतीची असून, तेथील एकंदर शास्त्रीय व सांस्कृतिक पातळीच मागासलेली आहे. कांहींहि असो. या चर्चेच्या, पुस्तकाच्या व त्यावरील मंडन–खंडनपर टीकेच्या निमित्तानें शास्त्राच्या क्षेत्रांतहि विरोधविकासी विचारसरणीचा 'चंचुप्रवेश' म्हणा किंवा 'मुसल-प्रवेश' म्हणा, आतां झाला आहे हें निश्चित. बुद्धिवादी शास्त्रीय दृष्टीची ही कसोटीच आहे.

## "लोकशाही समाजवादाचा पुनर्जन्म"

इंग्लंडांत मजूर–मंत्रिमंडळ येऊन समाजवादी "कल्याणदर्शी" सत्ते( welfare state )ची स्थापना झाली, तेव्हां युरोपांतलि लोकशाही समाजवादाचा एक निश्चित कालखंड सुरू झाला. अमेरिकन मजूरजगतांतही या ब्रिटनप्रणीत "वेल्फेअर स्टेट"च्या प्रयोगाची चहा होऊं लागली असून बाहेरून भांडवलदारीचा बालेकिल्ला वाटणाऱ्या अमेरिकेंत मजूरसत्ताविरोधी भांडवलदारी धोरणाची प्रतिक्रिया जोरानें सुरू झाली आहे. आतां साम्यवादी युगोस्लाव्हियाबाबत रशियाच्या सर्वाधिकारी साम्यवादी सरकारनें जी वृत्ति प्रकट केली आहे, त्यामुळें रशियनछाप कम्युनिझमविषयीं पूर्वीच वाटूं लागलेली आशंका मूर्त रूप घेऊं लागली आहे. या चालू कालखंडांत युरोपांतलि लोकशाही समाजवादाचा पुनर्जन्मच होत आहे. सनदशीर समाजवादी विकासाला मिळणारा वाढता पाठिंबा आणि मॉस्कोसत्ताप्रणीत साम्यवादी आक्रमणाविरुद्ध वाढत जाणारी प्रतिक्रिया यामुळें या सनदशीर समाजवादी चळवळीकडे लक्ष देणें अगत्याचें झालें आहे. हिंदुस्थानांतहि असा समाजवादी पक्ष सनदशीर मार्गानें सत्तारूढ होण्याचे प्रयत्न करीत आहे. इंग्लंडांत समाजवादी संमेलनांत हिंदी समाजवादी पक्षाचे दोन प्रतिनिधीहि भाग घेणार असल्याची बातमी आहे. अशा वेळीं या युरोपीय समाजवादी लोकसत्तेचें सध्यां कोणतें स्वरूप आहे तें करून घेणें जरूरीचें आहे. मि. ज्यूलियस ब्रॉन्थाल यांनीं "दि रीबर्थ् ऑफ् सोशल् डेमॉक्रसी" या मथळ्याचा सविस्तर लेख अमेरिकेंतील "फॉरेन् अफेअर्स" नामक त्रैमासिकांत (जुलै १९४९) लिहून याचें स्पष्ट दिग्दर्शन केलें आहे. त्यांतील महत्त्वाचा प्रास्ताविक भाग संक्षेपानें पुढें दिला आहे.

"सन १९२० मध्यें जेव्हां ब्रिटननें रशियन क्रांतिसंबंधांत हस्तक्षेप करावयाचा प्रयत्न केला तेव्हां त्यावेळचे गोदी-कामगारांचे पुढारी मि. अर्नेस्ट बेव्हिन यांनीं हा हस्तक्षेप थांबविण्यासाठीं 'चळवळ-मंडळें' संघटित केलीं आणि संपहि घडवून आणले. सन १९४८ सालीं ब्रिटिश परराष्ट्रमंत्रिपदावर आरूढ असलेल्या त्याच अर्नेस्ट बेव्हिननीं ब्रुसेल्स-तहावर सही केली आणि एका वर्षानें उत्तर अटलॉन्टिक करारावरही सही केली. जरी ह्या दोन्ही गोष्टी केवळ संरक्षणाच्या दृष्टीनेंच घडून आलेल्या असल्या तरी त्यांत रशियाबरोबरच्या युद्धाची शक्यता भरून राहिलेली आहे. १९२० व १९४९ या दोन्हीं सालीं बेव्हिनना ब्रिटिश कामगार-वर्गाच्या प्रचंड बहुमताचा आणि युरोप–खंडांतील

हुतेक सर्व लोकशाही समाजवादी पक्षांचा पूरेपूर ाठिंबा होता.

" साम्यवादी रशियाबाबत घडलेला हा वृत्तिभेद लीकडेच घडलेला आहे. दुसऱ्या युद्धाच्या खातीपर्यंत लोकशाही समाजवाद्यांना सोव्हियेत निअन ही मोठी क्रांतिकारक शक्ति वाटत ती. भांडवलदारी नष्ट केलेलें तें पहिलें आणि कमेव राष्ट्र होतें. १९२३ सालीं परत भरलेल्या शॅलिस्ट-मजूर इंटरनॅशनलनें मात्र अशी मागणी ली कीं, 'दहशतवादी पक्षनिष्ठ सर्वाधिकारी सत्ता ष्ट करावी आणि जनतेच्या राजकीय स्वातंत्र्याचें लोकशाही स्वराज्याचें धोरण अमलांत आणावें.' ींपण रशियन हुकुमशाहिकडे अपरिहार्य म्हणून नेच्या दृष्टीनेंच पाहिलें जात असे.

" ज्या देशांत कम्युनिस्ट पक्ष बलवान् नव्हते शा ग्रेट ब्रिटन, स्वित्झरलंड आणि ास्ट्रिया या देशांतील समाजवादी चळवळींत रशियाविषयक सहानूभूति अतिशय गाढ ती.... हिटलरनें रशियावर स्वारी केली विळीं तर सहानुभूतीची ही भावना, मध्यंतरीं ी झाली होती तरी, पुन्हा उसळली. रशियाच्या जयाबद्दल त्यांना नितांत प्रेम वाटूं लागलें आणि ९४९ सालीं ब्रिटनमध्यें मजूरपक्षानें सत्ता हातीं ल्यावर तर असें वाटूं लागलें कीं मध्यंतरीं ींही घडलें असलें तरी आतां ब्रिटन व रशिया मध्यें खरी दिलजमाई होईल आणि समाजवादी साम्यवादी यांच्यांत कायमचा समझोता घडेल. ु याला तीन वर्षें होतात न होतात तोंच टनच्या सोशालिस्ट सरकारनें आणि सोशालिस्ट भाग घेत असलेल्या फ्रान्स, बेल्जिअम, हॉलन्ड लक्सेंबर्ग येथील सरकारांनीं ब्रूसेल्स तह व उत्तर ॲलॅन्टिक करार हे घडवून आणले.

" या बदलाचें कारण,साम्यवादी रशियाच्या पाय ण्याच्या धोरणाचें आंतरिक स्वरूप १९४७–४८ ांत उघड झालें हें होय.... तोंपर्यंत असें लें नव्हतें कीं कम्युनिस्ट रशिया आपल्या सत्तेखालीं ऱ्या देशांना स्वतंत्र अस्तित्व न ठेवतां सोव्हियेत ांत सामील करून घेईल आणि तीं राष्ट्रें म्हणजे ळ मॉस्कोनें नेमलेल्या गव्हर्नरांच्या ताब्यांतील रशियन प्रांत बनतील...! पण तीन बाल्टिक राष्ट्र सरळ सोव्हियेत संघांत सामील करून घेतलीं गेलीं आणि पोलंड, हंगेरी, बल्गेरिया, रुमानिया, अल्बेनिया–आणि झेकोस्लोव्हाकियासुद्धां सर्व राष्ट्रें रशियन अधिराज्याच्या वसाहती बनल्या! सत्ता-विस्ताराचा या तऱ्हेचा अखेरचा पुरावा कम्युनिस्ट यूगोस्लाव्हियाबाबतच्या रशियन धोरणानें उघड उघड दिला आहे. कांहीं प्रमाणांत स्वातंत्र्य टिकवून धरण्याचा प्रयत्न करतांच (कम्युनिस्ट असूनहि) युगोस्लाव्हिया (रशियाचें) दुष्मन बनलें!

" तात्त्विक व भूतदयात्मक विचारांप्रमाणेंच आत्मसंरक्षणाची दृष्टीहि आंतरराष्ट्रीय समाजवादी लोकशाहींत असतेच असते. समाजवादी लोकांची अशी आशा आहे कीं एकदाचा सामर्थ्यांचा सम-तोलपणा प्रस्थापित झाला आणि समाजवादी सत्तासंक्रमणाचा मार्ग म्हणून (सनदशीर) समाज-वादी लोकशाही ब्रिटनप्रमाणेंच इतरत्र यशस्वी झाली म्हणजे मग समाजवादी पश्चिम यूरोप आणि साम्यवादी पूर्व यूरोप (व रशिया) यांमध्यें सलोखा उत्पन्न व्हावयास चांगली बैठक तरी तयार झाली असें होईल "

## लाल पूर्वजर्मनी व चीन, 'राष्ट्रवादी' हिंदु

(१) " जर्मनींतील बऱ्या राष्ट्रांच्या राजकार-णाचे फांसे जर्मन राष्ट्रवादाच्या अनुरोधानें पडत आहेत. Tagliche Rundschau या पूर्वजर्मनींतील सोव्हिअेट लष्करी हुकमतीच्या अधिकृत मुखपत्रानें जेव्हां असें लिहिलें कीं, 'नॅशनल फ्रंट' या (सरकारी पक्षा)मध्यें पितृभूमीचें एकत्व व स्वातंत्र्य हृदयाशीं बाळगणारीं सर्व शक्तिकेंद्रें एकत्रित झालीं आहेत आणि जर्मन जनतेच्या खऱ्या राष्ट्रीय हितांचें तो पक्ष संरक्षण करूं चाहतो तेव्हां खरोखर त्यांतून सोव्हिअेत कार्यक्रमच स्पष्टपणें आंखलेला दिसत होता. वायमार कालखंडांत 'राष्ट्रवादी तिकिट' उजव्या गटाच्या हातीं जाऊं दिलें ही जर्मन कम्युनिस्टांची मोठी घोडचूक झाली, असें रशियनांना नेहमीं वाटत आलें आहे. या कारणास्तवच आल्ब्रिक्टनें गेल्या ऑगस्टमध्यें असें वक्तव्य केलें कीं, 'समाजवादी एकतापक्षाला












व्यक्तीच्या पक्षगत सभासदत्वाकडे लक्ष न देतां राष्ट्रवादी वृत्तीच्या प्रत्येक जर्मनाबरोबर खांद्याला खांदा लावून आगेकदम करावें लागेल, प्रत्येक जर्मनाची इच्छा जर्मनी एकसंध व्हावा हीच असेल आणि त्यानंतर जर्मनीचा ताबा घेणाऱ्या सैन्याची हकालपट्टी व्हावी असेंच त्याला वाटत राहील '. " (" न्यू स्टेटमन ॲन्ड नेशन ", १५ ऑक्टो. ४९, ' जर्मनीसाठीं शर्यत ' हा लेख ).

हिंदी कम्युनिस्ट पक्षानेंहि राष्ट्रीय चळवळीबाबत वर दर्शविलेली घोडचूक केल्याचें त्यांच्यांतील एका गटाला पूर्वीच कळून आलें होतें. म्हणून त्यांनीं धोरण बदलून राष्ट्रीय वृत्तीला उचलून धरण्याचा कांहीं दिवस देखावा केला. पण १९४२ च्या प्रचंड चळवळींत हा डाव उघडकीस आला व कम्युनिस्ट पक्षाचा राष्ट्रवादी आम जनतेशीं अजीबात संबंध तुटला. कदाचित् भविष्यकालीं वायमर कालखण्डांतील जर्मन कम्युनिस्टांप्रमाणेंच गांधीयुगीन कालखण्डांतील हिंदी कम्युनिस्टांनाहि रशियन कम्युनिस्ट लोक याबद्दल असाच ठपका देतील; निदान या दोन ऐतिहासिक घटनांत साम्य तरी विलक्षण आहे.

(२) " लाल चीनमधील कम्युनिस्टांनींहि राष्ट्रीय–भांडवलदार म्हटल्या जाणाऱ्यांशीं मिळतें घेण्याचें धोरण स्वीकारलेलें दिसतें. उत्तर भागांत आपल्या अतिरिक्त–कम्युनिस्ट मार्गामुळें उद्योग-धंद्यांचा नाश झाल्याची चूक ते आतां मान्य करतात यावरून त्यांचें हें धोरण मनापासूनचें असावें असें वाटतें. उत्तरेकडच्या चुका पुढें रशियनांनीं दुरुस्त केल्या... चिनी सोव्हियेत कारखान्यांतील संयुक्त व्यवस्थापद्धतीनें त्यांचे डोळे उघडले. रशियन व्यवस्थापकांना भांडवलदारीची आपल्याइतकीच उत्कृष्ट माहिती असते. पूर्वी (चिनी कम्युनिस्टांच्या व्यवस्थेखालीं) जेथें मंजूर व व्यवस्थापकवर्ग यांना सारखीच मजुरी मिळे तेथें संयुक्त व्यवस्थापकांनीं भिन्न भिन्न मजुरी चालू केली आहे. त्यांनीं आपल्या चिनी भाईंना हें स्पष्ट करून दाखविलें कीं, प्रथम उत्पादन आणि संपात्ति वाढविली पाहिजेत व मगच त्यांची सारखी वांटणी करावयास पाहिजे. या कठोर अनुभवामुळेंच खरोखर चिनी अतिसाम्यवाद्यांचें रूपांतर आर्थिक दृष्टीनें तरी बूर्ज्वा ( मध्यमवर्गीय ) भांडवलदारांत झालेलें आहे. अंतर्गत राजकारणांत तर सुधारणा त्वरित घडवून आणण्याच्या धोरणाबाबत त्यांची वृत्ति फार सावधगिरीची आहे आणि त्यांचे प्रचारक अतिसाम्यवाद्यांना ठपका द्यावयाचा एकहि प्रसंग वायां दवडीत नाहींत. त्यांचें मुख्य लक्ष्य हें आहे कीं पैशाच्या मोहाला बळी न पडणाऱ्या सरकारी नोकरांचा वर्ग असणारें सरकार मजबूत पायावर टिकवावयाचें व राज्यकारभार कसा चालवावा ह्याचे नवे धडे घ्यावयास त्यांना सज्ज ठेवावयाचें. " (" न्यू स्टेट्स्मन ॲन्ड नेशन, " १५ ऑक्टो. ४९. शांघायच्या बातमीदारांचें " लाल शांघाय " नांवाचें बातमीपत्र.)

भारताचे महामंत्री पं. नेहरू मतानें समाजवादी आहेत पण त्यांच्या सरकारचें चालू धोरण लाल चीनमधलि धोरणाप्रमाणेंच अधिक उत्पादन व उत्कृष्ट नोकरवर्ग निर्माण करून सरकारला स्थैर्य आणण्याचेंच आहे. भारत चीनपेक्षां औद्योगिक दृष्टीनें थोडासा जास्त पुढारलेला असला तरी ' अतिसाम्यवादी ' प्रयोग करण्याएवढा निश्चित पुढारलेला नाहीं व म्हणूनच आपल्या सरकारचे उद्योगधंद्यांच्या वाढीचे प्रयत्न शास्त्रीय दृष्टीच्या समाजवादालाहि अपरिहार्य वाटतील. परंतु नेहरूसरकारचे डाव्या गटांतील टीकाकार या प्रयत्नांना ' भांडवलदारधार्जिणी ' वृत्ति म्हणून त्यांची हेटाळणी करतात. या ' अतिसाम्यवादी ' डाव्या गटाला चीनच्या वरील उदाहरणानें योग्य तें उत्तर परस्परच दिलें आहे.

लाल पूर्वजर्मनी, लाल चीन व स्वतंत्र भारत यांमधलि राजकारणांत व अर्थकारणांत आढळून येणारीं हीं साम्यस्थळें नेहरू-सरकारची बाजू अधिक मजबूत बनवितात यांत शंका वाटत नाहीं. मात्र यांतील भेदहि लक्षांत घेण्यासारखा आहे. वरील दोन्ही राष्ट्रांत साम्यवादी गटाचें प्रभुत्व आहे. भारतांतील सरकारांत समाजवादी विचाराचे नेहरू असले तरी सरकार अजून समाजवादी पक्षाचें नाहीं. याचे परिणाम काय होतील ते खरें.










## सुरक्षासमितीवर भारताची निवड

१९४७ सालीं भारत सरकारच्या प्रातिनिधीनें संयुक्त-राष्ट्रांच्या सुरक्षासमितिवर सभासद निवडून येण्यासाठीं उमेदवारी केली. पण त्या वेळीं निवड होणें फार कठीण झालें, मोठे कूटप्रश्न उभे राहिले आणि भारताच्या प्रतिनिधीनें उमेदवारी मागें घेतल्यामुळेंच ते प्रश्न निकालांत निघाले. या वेळीं मात्र भारताचा प्रातिनिधि (दोन वगळून बाकी) सर्व संयुक्त-राष्ट्रांच्या मतानें निवडून आला ही गोष्ट अभिमानाची आहे यांत शंकाच नाहीं. पण त्या वेळीं व या वेळीं ज्या गटांतर्फे ही निवडणूक लढविली त्यांत मात्र फरक आहे; व त्या फरकाच्या प्रकाशांतच या वेळची भारताची सहजीं झालेली निवड स्पष्ट करूं शकते. त्यावेळीं हिंदी प्रातिनिधी युक्रेनचा प्रतिस्पर्धी म्हणून होता; म्हणजे पूर्वेकडील राष्ट्रांचा प्रतिनिधि म्हणून तो उमेदवारी होती व रशियाच्या वर्तुळांतील सर्व राष्ट्रांचा त्याला स्वाभाविक विरोध होता; पण यावेळीं भारत ब्रिटिश राष्ट्र-समूहाचा प्रातिनिधि म्हणून उमेदवार होतें व त्या नात्यानें निवड व्हायला फारशी अडचण उद्भवली नाहीं. पण अडचणी कमी कीं जास्त आल्या यापेक्षांहि सुरक्षासमितीवर घेण्याइतका विश्वास बहुतेक राष्ट्रांनीं भारतावर दाखविला यांतच त्याचा गौरव आहे. पाकिस्ताननें या सभासदत्वाबद्दल काश्मीरचा प्रश्न चालू असल्यामुळें जरी भय दर्शविलें होतें तरीहि ही निवड बहुमतानें झाली ही घटना अर्थपूर्ण आहे. या विषयावर "ईस्टर्न इकॉनॉमिस्ट" या दिल्लीच्या नियतकालिकानें २८ ऑक्टोबर १९४९ च्या अंकांत स्पष्टोक्तिपूर्ण लेख लिहिला आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग संक्षेपतः पुढें दिला आहे :

"पण (ब्रिटिश कॉमनवेल्थच्या सभासदत्वा-पेक्षांहि) निराळ्या गोष्टीमुळें भारताच्या या निवडीला महत्त्व आहे. चीनचें कायम सभासदत्व वगळल्यास आशियांतील कोणाहि राष्ट्राला अजून-पर्यंत या समितिवर स्थान मिळालें नव्हतें आणि चीनचें हें प्रतिनिधित्व आशियाच्या दृष्टीनें नेहमीं कमकुवतच होतें. आतां 'लाल' चीनला आशियाच्या राष्ट्रांचें प्रातिनिधित्व करावयास मान्यता मिळेलसें वाटत नाहीं. तेव्हां भारताच्या या निवडीमुळें सं. राष्ट्रांनीं जगाच्या या भागाचें महत्त्व मान्य केल्याचें शाबीत होतें. कॉमनवेल्थच्या प्रातिनिधित्वाएवढेंच हेंहि महत्त्वाचें आहे.

"जगाच्या घडामोडींत भारताला हें जें प्रमुख स्थान लाभलें आहे त्यामुळें भारताच्या सुरक्षा-समितींतील व बाहेरील परराष्ट्रीय धोरणावर परिणाम घडणारच... आशियांतील मागसलेल्या राष्ट्रांचें वसाहतींच्या रूपानें चाललेलें शोषण थांबविणें व कोठल्याही स्वरूपांत आढळणाऱ्या वर्णभेदाला विरोध करणें त्या दोन गोष्टींबाबत भारताचें धोरण प्रसिद्ध झालेलेंच आहे. आणि खरोखर यामुळेंच हिंदुस्थानला आशियांतील राष्ट्रांच्या स्वातंत्र्य-व-समतेच्या झगड्यांतील न्यायाचा प्रवक्ता म्हणून मान्यता मिळालेली आहे. इंडोने-शियाबाबत दिल्लीला जी राष्ट्रपरिषद् भरविली गेली त्यामुळें हिंदुस्थानला आशियाचें नैसर्गिक नेतृत्व लाभलें व तें सुरक्षासमितींत यापुढेंहि चालू राहण्याचा फार संभव आहे.

"संयुक्त राष्ट्रांची वाढती निष्क्रियता व रशिया-अमेरिकेंतील 'थंडें युद्ध' यामुळें सुरक्षासमितींत विशेष परिणाम घडवून आणण्याचे प्रसंग हिंदु-स्थानला लाभतील असें वाटत नाहीं.... परंतु हिंदुस्थानची भूमिका त्याच्या सर्वसामान्य परराष्ट्रीय धोरणावरून ठरविली जाईल व हें सुरक्षासमितीवरील सभासदत्व संपल्यावरहि जें कांहीं महत्त्व त्याबाबत असेल तें कमी व्हावयाचें कारण नाहीं.

"पाकिस्ताननें जी भीति प्रदर्शित केली ती अना-ठायीं होती. एखादें राष्ट्र समितिवर असतां त्याच्याच विनंतीमुळें समितीपुढें चर्चेला एखादी तक्रार यावी असा प्रसंग अजूनपर्यंत उद्भवला नव्हता हें खरें. सीरिया व ईजिप्तचा संबंध पॅलेस्टाईनशीं दुरून होता म्हणून ती तुलना योग्य होणार नाहीं. परंतु एकतर समितीची कार्यपद्धतीच अशी आहे कीं काश्मीरचा प्रश्न चर्चेला आला असतां सभासद अस-णाऱ्या भारताला त्यांत भाग घेतांच येणार नाहीं; आणि दुसरें म्हणजे आतां विशेष मांडावयाचा मुद्दाच राहिलेला नाहीं. पण खरी गोष्ट अशी आहे कीं,





अनुक्रमणिका

समितीवरील पांच कायम सभासदराष्ट्रांच्या मतांप्रमाणें महत्त्वाचे निर्णय घेतले जातात; एखाद्या अन्य सभासदाची निवड इकडे तिकडे झाली म्हणून त्यांत विशेष फरक होत नाहीं. तेव्हां आपली सुरक्षा-समितीवर निवड होणें ही गोष्ट इतर कोठल्याहि गोष्टींपेक्षां आपल्या जागतिक दर्जाची निदर्शक आहे. ''

## सत्याग्रहानें बेबंदशाही कधींच माजणार नाहीं

श्री. शंकरराव देव यांनीं डिसेंबर महिन्यांत दिल्लीहून लिहिलेले 'Satyagraha and Gandhian revolution' या विषयावरील दोन लेख इंग्रजी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाले आहेत. डॉ.आंबेडकर यांनीं सत्याग्रहाच्या मार्गाला 'Gammar of Anarchy' म्हणून निषिद्ध ठरविलें. त्याबाबत श्री. शंकरराव देव यांनीं आपले विचार वरील दोन लेखांतून प्रकट केले आहेत. त्यांचा सारांश पुढें दिला आहे:

'' कायदेमंडळांतलि कार्याला गांधिजींनीं जरी आपला नैतिक पाठिंबा दिला असला, तरी त्यावर गांधिजींचा विश्वास कधींच नव्हता. त्यांचा विश्वास होता सेवेद्वारा किंवा सत्याग्रहद्वारा केलेल्या प्रत्यक्ष कार्यावर. सत्याग्रह म्हणजे सेवेचा तर्कशुद्ध आणि नैसर्गिक परिपाक होय. गांधिजींच्या शस्त्रागारांत हिंसाशस्त्राला थारा नव्हता. तरी देखील आधुनिक काळांतील ते एक अत्यंत महान् आणि यशस्वी क्रांतिकारक ठरले ! मानवाच्या संस्थांपेक्षां मानवाचें हृदय आणि बुद्धि यांवरच त्यांनीं आपलें लक्ष्य केंद्रित केलें होतें आणि यांतच त्यांच्या यशाचें इंगित आहे.

''गांधीजी जेव्हां दक्षिण आफ्रिकेंतून हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांनीं दक्षिण आफ्रिकेंतच निर्मिलेलें व प्रयोग करून पारखलेलें आपलें सत्याग्रहाचें शस्त्र बरोबर आणलें व तें हिंदी जनतेच्या हातीं दिलें. त्यांचा सत्याग्रह म्हणजे केवळ निर्बलांचा द्वेषग्रस्त निःशस्त्र प्रतिकार नव्हता; त्यांचा सत्याग्रह प्रेमांतून उद्भूत झाला असून, तें एक बलवानांचें संपूर्णपणें सोळा आणे नैतिक असें शस्त्र होतें. या सत्याग्रहाची पूर्वतयारी म्हणून त्यांनीं हिंदी जनतेसमोर आपला विविध रचनात्मक कार्यक्रम ठेवला. या रचनात्मक कार्यक्रमांतील प्रत्येक कार्याच्या मागें जनसेवेची प्रेममय प्रेरणा होती. या रचनात्मक कार्यक्रमांत समाविष्ट केलेल्या कार्यांपैकीं असें एकही कार्य नव्हतें कीं जें अगदीं नवीनच होतें, किंवा ज्याचा उपयोग कधीं काळीं गांधीजींपूर्वीं कोणी समाजसेवकानें केलाच नव्हता ! परंतु गांधीजींचें वैशिष्ट्य हें कीं, ते नुसते समाजसुधारक नव्हते. ते एक महान् राजकीय क्रांतिकारक होते. त्यांचा रचनात्मक कार्यक्रम हा राजकीय क्रांतीची आणि सामाजिक क्रांतीची पूर्वतयारी किंवा साधना होती. लोकांची खरी निकडीची गरज म्हणजे त्यांना राजकीय अधिकार पाहिजे होते. आणि गांधीजींनीं ही जनतेची गरज पुरेपूर पूर्ण केली !

'' लवकरच आपण बनविलेली स्वतंत्र भारताची लोकशाही घटना अंमलांत येणार आहे. परंतु आपली ही लोकशाही नवजात असून तिच्यामधून सर्वाधिकारी झोटिंगशाही निर्माण होण्याचाहि धोका आहे. त्या अनर्थावह भवितव्याचीं बिजें आपल्या राज्यघटनेंत आहेत, एवढेंच नव्हे तर परिस्थितीहि अशा सर्वाधिकारशाहीला अनुकूल असण्याचा संभव आहे. कारण, युद्धाच्या ताणानें अर्थव्यवस्थेला तडे पडले असून त्यांतून सर्वाधिकारशाहीचे विषारी जंतु केव्हां फोफावतील याचा नेम नाहीं. यावर रामबाण उपाय म्हणजे डॉ. आंबेडकर यांनीं म्हटल्याप्रमाणें आपल्या राजकीय लोकशाहीचें सामाजिक आणि आर्थिक लोकशाहींत रूपांतर ताबडतोब करणें हा होय.

'' भारताच्या पंतप्रधानांनीं आपल्या अमेरिकन दौऱ्यांत असें आवर्जून सांगितलें कीं सामाजिक आणि आर्थिक क्रांति गांधीजींच्या मार्गानें घडवून आणून गांधीवादाचें प्रत्यक्ष आचरण हिंदुस्थान कसें करून दाखवितो याकडे जगाचे डोळे लागले आहेत! परंतु मला तर वाटतें कीं आपण जी राज्यघटना बनविली आहे तिच्यांत गांधीवादाचा मागमूसहि नाहीं. आपल्या देशांत झालेली शांतिमय राजकीय क्रांति जर खरी असेल, तर आपल्या सामाजिक व आर्थिक संस्थांवर गांधीजींच्या जीवनदृष्टीचा आणि कार्यक्रमाचा ठसा स्पष्ट उमटला









अनुक्रमणिका

पाहिजे. प्रादेशिक स्वयंपूर्णतेवर आधारलेली सहकार्यप्रधान विकेन्द्रित अर्थव्यवस्था आणि अहिंसक लोकशाहीप्रधान समाजव्यवस्था हे गांधीवादांतील दोन महत्त्वाचे कार्यक्रम असून सर्वोदय हें त्याचें ध्येय आहे. आपल्या नवीन राज्यघटनेचा भर विकेन्द्रीकरणापेक्षां केन्द्रीकरणावरच अधिक आहे. परंतु याबद्दल दुसऱ्याला दोष देण्यांत अर्थ नाहीं. मिरॅबोनें म्हटल्याप्रमाणें राज्यघटना म्हणजे ज्या लोकांनीं ती बनविली त्याचा तो आरसा आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं १५ ऑगस्ट १९४७ ला केवळ सत्तासंक्रमण झालें; क्रांति नव्हे! राज्यघटना म्हणजे नुसती नोंद, जें कांहीं घडून आलें त्याची कायद्याच्या भाषेंत केलेली मांडणी. घटना म्हणजे कार्यक्रम नव्हे. जें आज नाहीं पण जें पुढें साध्य करून घ्यायचें आहे त्याकरितां कार्यक्रमाचीच जरूरी आहे. जर आपण मनांत आणलें तर सत्तेचें आणि उत्पादनाचें विकेंद्रीकरण हा गांधीजींचा कार्यक्रम आपणांस स्वीकारतां येईल व डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं म्हटल्याप्रमाणें आपण मिळाविलेल्या स्वातंत्र्याचें मधुर फळ रस्त्यांवरील सामान्यांतल्या सामान्य माणसालाहि चाखायला मिळेल.

"आज कांहीं सुज्ञ विचारवंत आम्हांला असा सल्ला देत आहेत कीं, यापुढें सविनय कायदेभंग, असहकार आणि सत्याग्रह यांचा मार्ग हा निषिद्ध समजावा, कारण या गोष्टी म्हणजे शुद्ध 'बेबंदशाहीचें व्याकरण' होत! परंतु या गोष्टी सदैव निषिद्ध समजणें म्हणजे आपल्या राष्ट्रपित्याच्या शिकवणुकीचाच त्याग करणें होय! लोकशाहीचें मूलभूत तत्त्व जर कोणतें असेल तर तें व्यक्तीचें स्वातंत्र्य, व्यक्तीला आपली सदसद्विवेकबुद्धि वापरण्याचें स्वातंत्र्य हें होय. सत्याग्रह निषिद्ध समजणें म्हणजे या लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वालाच हरताळ फांसणें होय. उलट लोकशाहीची हत्या होऊं नये, ती शुद्ध स्वरूपांत जिवंत राहावी अशी जर इच्छा असेल तर त्याला अहिंसक असहकार किंवा सत्याग्रह हेंच एकमेव साधन असूं शकतें. अलीकडेच पं. जवाहरलाल नेहरू आपल्या कोलंबिया विद्यापीठांतील भाषणांत म्हणाले : 'एका मोठ्या बलाढ्य राष्ट्रांविरुद्ध आम्ही अटीतटीनें लढा करून विजय संपादन केला. परंतु त्या विजयाचें अत्यंत अर्थपूर्ण मूल्य जर कशांत असेल तर तो लढा आम्ही ज्या पद्धतीनें लढविला त्या पद्धतींत आहे. अर्थात् त्याबद्दलचें श्रेय आमच्या प्रतिपक्षालाहि आहेच. एक अत्यंत दारुण असा संघर्ष इतक्या शांततेनें मिटावा आणि पाठीमागून इतका स्नेह आणि सलोखा निर्माण व्हावा ही गोष्ट इतिहासांत तरी अपूर्व होय. मी उपदेश करायचें धाष्ट्र्य करीत नाहीं. परंतु हिंदुस्थाननें घडवून आणलेल्या अहिंसक राजकीय क्रांतीचें तंत्र जगापुढें असलेले अनेक मोठे प्रश्न सोडविण्याच्या कामीं उपयोगी पडूं शकेल एवढेंच मला सुचवावयाचें आहे.' पंडितजींच्या उद्गारांवरून हें स्पष्ट होतें कीं, त्यांच्या मनासमोर गांधीजींचेंच क्रांतितंत्र असून त्याचा उपयोग आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्याकरितां करावा असें ते सुचवीत आहेत. त्यांच्या आत्मचरित्रांतहि त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, 'अहिंसक संग्रामाचें तंत्र केवळ परकीय राज्यकर्त्यांविरुद्धच वापरायचें असें नव्हे; उलट आपल्या देशांतच स्वकीयांची स्वार्थलोलुपता आणि अत्याचारी प्रवृत्ति यांविरुद्ध तें तंत्र वापरणें अधिक सुलभ व अंतीं सुपरिणामीच होईल.'

"म्हणून पारतंत्र्यांत वा स्वातंत्र्यांत, गांधीजींचें तंत्र सारखेंच प्रभावी राहील. पाशवी किंवा शारीरिक बळाऐवजीं नैतिक बळाचाच उपयोग करणें हा त्या तंत्राचा गाभा आहे. त्या तंत्राच्या योगानें सामाजिक बदल त्वरेनें आणि हमखास घडून तर येतोच पण तो घडत असतांना बेबंदशाहीची किंवा सामाजिक अव्यवस्थेची भीति बिलकूल रहात नाहीं.

"मात्र खरा सत्याग्रह नैतिक आणि सांस्कृतिक संपदेनें युक्त अशा अध्यात्मसंपन्न माणसाकडूनच होऊं शकतो. सत्याग्रहाची मुख्य प्रेरक शक्ति म्हणजे मानवाची सेवा आणि समाजाविषयीं प्रेम आणि सदिच्छा. ह्या सेवेचें उत्तम प्रतीक म्हणजे रचनात्मक कार्यक्रम होय. या रचनात्मक कार्यक्रमाची साधना करणाऱ्या अध्यात्मसंपन्न सत्याग्रह्यानें केलेल्या सत्याग्रहानें समाजांत बेबंदशाही कधींच माजणार नाहीं. उलट पक्षीं, सत्याग्रहाच्या

नांवाखालीं जो निःशस्त्र प्रतिकार चालतो त्यानेंच अव्यवस्था आणि बेबंदशाही माजते.

## जगांतील मोटारकारखान्यांचें उत्पादन

लंडन येथील Statist या साप्ताहिकानें तारीख १ ऑक्टोबर १९४९ ला एक खास मोटार–पुरवणी अंक काढला होता. त्याच्या आधारें खाली दिलेली माहिती संकलित केली आहे :

जगांतील सर्व मोटारकारखान्यांचें उत्पादन आज वर्षाकांठीं ७५ लाख गाड्या इतकें आहे. यांतील शेंकडा ८० टक्के उत्पादन केवळ युनायटेड स्टेट्सचें आहे. बाकीच्या उत्पादनाचा ⅘ भाग मुख्यत्वें ब्रिटन, फ्रान्स, कॅनडा, जर्मनी व इटली या देशांचा आहे. या सहा राष्ट्रांखेरीज इतर ज्या १५ राष्ट्रांत हा उद्योगधंदा थोड्याबहुत प्रमाणावर चालतो, त्यांत रशियाचा नंबर पहिला लागेल व त्याच्या खालोखाल झेकोस्लोव्हॉकिया आणि जपान यांचें उत्पादन आहे.

युद्धकालीं या सर्वच राष्ट्रांचें मोटरींचें उत्पादन कमी झालें होतें. युद्ध संपल्यानंतर १९४६त कॅनडानें प्रथम आपलें युद्धपूर्व उत्पादन गांठलें, तर ब्रिटन आणि युनायटेड स्टेट्स यांनीं १९४७त पूर्वस्थिति गांठली. फ्रान्स व इटली यांना तसें करण्यास १९४९ पर्यंत थांबावें लागलें. जर्मनींत मात्र अद्यापही उत्पादन युद्धपूर्व उत्पादनाचें ६० टक्केच आहे.

युनायटेड स्टेट्सला सध्यां उत्पादनसाधनें मुबलक आहेत. मजूरपरिस्थिति हल्लींप्रमाणेंच समाधानकारक राहिल्यास वीस वर्षांपूर्वीं गांठलेला ५४ लाख गाड्या हा उच्चांक यंदा अमेरिकेला सहज मागें टाकतां येईल. अर्थात् डॉलर हें दुर्लभ चलन असल्यामुळें अमेरिकन मोटरींची निर्यात मोठ्या प्रमाणावर होणें कठिणच आहे. असें असलें तरी अंतर्गत बाजारपेठेंत मोटरींचा खप व्यवस्थितपणें होत आहे. अमेरिकेच्या उत्पादनाचा शेंकडा ८५ इतका भाग तीन मोठ्या कंपन्यांकडे आहे. त्या म्हणजे जनरल मोटर्स, क्रायस्लर व फोर्ड.

ब्रिटनला अद्याप उत्पादनसाधनांचा तुटवडा भासत आहे व म्हणूनच ५ लाख मोटरी व २॥ लाख मालगाड्या इतकें उत्पादन शक्य असून सुद्धां काढतां येत नाहीं. हें उत्पादन मुख्यत्वें ऑस्टिन, नफील्ड, फोर्ड, व्हॉक्सॉल, स्टँडर्ड व रूट्स या कंपन्यांकडे आहे. तयार होणाऱ्या मालापैकीं निम्मा परदेशीं बाजारपेठांत खपविला जातो.

जानेवारी ते जून १९४९ या सहा महिन्यांचें उत्पादन व निर्यातीचे आकडे खालीं दिले आहेत.

याच कालावधींत हिंदुस्थानांत मोटारींची आयात खालीलप्रमाणें झाली:—

| | मोटारी व ट्रक्स |
|---|---|
| ब्रिटन | ७३०० |
| युनायटेड स्टेट्स | ७४०२ |
| फ्रान्स | ५३ |
| कॅनडा | १०६१ |
| इटली | १४३ |

---

| राष्ट्र | उत्पादन मोटारी व ट्रक्स | निर्यात मोटारी व ट्रक्स |
|---|---|---|
| युनायटेड स्टेट्स | २९,९४,२८४ | १,६४,१२० |
| ब्रिटन | ३,०१,९१६ | १,६४,३३८ |
| कॅनडा | १,४०,११५ | १२,६३३ |
| फ्रान्स | १,४१,६७८ | ५४,७५२ |
| जर्मनी | ५९,९०३ | ३,६५० |
| इटली | ३४,५८६ | ७,७२६ |



अनुक्रमणिका






